शेतकरी जीवनावर आधारलेलें सामाजिक नाटक

संगीत

# बंदीवान



लेखक:

द्वारकानाथ पांडुरंग पोतदार

सं. पहिल्या घरी, मंगलदान, स्वराविजय, भडकत्या ज्वाला, कला, परिवर्तन, अभिनंदन इत्यादि नाटकांचा कर्ता.

— प्रकाशक —

निंबकर आणि मंडळी

बुकसेलर्स, पब्लिशर्स, माधवबाग, मुंबई.

प्रथमावृत्ति ] किंमत १॥ रुपया [ १९४८



बाराही तास शेतांत राबून

जनतेला जगविणाऱ्या

शे त क री व र्गा च्या

उ न्न ती सा ठीं

काया वाचा मनें झटणाऱ्या

— कार्यकर्त्यांस —

समर्पण

—लेखक



छाया नाट्य-मंडळानें ता. २४ फेब्रुवारी १९४४ रोजीं दिवसा ३ वाजतां या खेळाचा प्रथम प्रयोग, दामोदर हॉल, परेल येथें करून दाखविला. त्या वेळीं खालील नटांनीं भूमिका केल्या होत्या—

| | |
|---|---|
| **अविनाश** :— | मि. बी. एम्. नागोटकर |
| **आबासाहेब** :— | ,, नारायणराव कोठारे |
| **सुधीर** :— | ,, शांताराम नाईक |
| **रामजी** :— | ,, कृष्णराव मोहिते |
| **आनंद** :— | ,, शंकर नाथ |
| **वसंत** :— | ,, रामचंद्रबुवा गोसावी |
| **सरला** :— | ,, बाबुराव तुपे |
| **सुमती** :— | ,, बांदेकर |
| **कोकिला** :— | ,, दाबके |
| **नाट्यनियोजक** :— | ,, नागोटकर |
| **सं. नियोजक** :— | ,, कांदळकर |

**चालक**

श्री. विठ्ठल वामन परब

---

# धागे दोरे !



बंदिवान हें माझें पहिलेंच नाटक ! पण योग पहा. त्याच्या नंतर लिहिलेल्या नाटकांना त्याच्या आधीं प्रसिद्धी मिळाली ! बंदीवानाप्रमाणेंच या नाटकाला बंदिखान्यांत खितपत पडावें लागतें. ता. २२ फेब्रुवारी १९४४ रोजीं या नाटकाचा प्रथम प्रयोग जनतेपुढें करून दाखविण्यांत आला. परंतु पुस्तक–रूपानें जनतेपुढें हें आजच येत आहे.



हिंदुस्थान हा शेतकी–प्रधान देश आहे. परंतु जो शेतकरी जनतेच्या अन्नाची बेगमी करतो, त्याला त्या अन्नाला मोताद व्हावं लागतं अशी मात्र वास्तव स्थिति आहे. अशा रात्रंदिवस काबाडकष्ट करणाऱ्या शेतकऱ्यांना जागृत करणाऱ्या नेत्याला, सावकार आपल्या सहकाऱ्यांच्या मदतीनं कारवाई करून कसा बंदीवान करतात त्याचं वास्तव–कल्पना–चित्र रेखाटतांना जरठ–बाला विवाहाविरुद्ध माझी लेखणी त्या अनुषंगानं चालविण्याचा मीं प्रयत्न केला आहे. त्याचप्रमाणें, सावकारांनीं धूर्तपणानें, गरिबांना नाडून, त्यांचे तळतळाट घेऊन कमावलेल्या पैशांचा विनियोग घेऊन, त्याच श्रीमंत बापाचा गडगंज संपत्तींत लोळणारा विलासी आणि ऐदी मुलगा कसा करतो व शेवटीं त्याची स्थिति काय होते, वगैरे चित्रं खेडेगावांत काम करीत असतांना पाहावयाला मिळतात. त्याचंच हें नाट्य–चित्र म्हणजे बंदीवान होय !!

बंदिवानचा जन्म १९३८ मध्यें झाला. त्यानंतर माझी ही पहिलीच नाट्य-कृति मीं माझ्या बऱ्याच मित्रांना दाखविली. त्यांत प्रामुख्यानं माझे मित्र श्री. सदाशिवराव शिंदे ( महाराष्ट्र सं. मं. ) मि. बलवन्त पी. व्ही., मि. ए. जी. कोठारे, मधुकर पोतदार व माझे गुरुजी भगवान लक्ष्मण पाटील यांनीं योग्य सूचना करून मला बिनमोल साह्य केलें. नाटक लिहून पुरें झालें, परंतु तें रंग-भूमीवर येण्याचा योग कांहीं येईना. एके दिवशीं श्री. नारायणराव कोठारे ( राष्ट्रभूषण सं. मं. ) यांनीं माझ्याकडे बंदिवानाची चोपडी मागितली. त्यांनीं ती वाचून ‘ छाया–नाट्य ’ मंडळाकडे दिली. सदर संस्थेचे डायरेक्टर

मि. बी. एम्. नागोटकर यांनीं नाटक रंगभूमिवर आणण्याचें ठरवून २२ फेब्रुवारी १९४४ रोजीं एन्. एन्. पाटील यांच्या अध्यक्षतेखालीं परळ दामोदर हॉलमध्यें या नाटकाचा प्रथम प्रयोग करून दाखविला.

कांहीं तरी लिहावें, लेखक म्हणून जनतेपुढें यावें, अशी आवड प्राथमिक शिक्षण क्षेत्रांतील माझे गुरुजी श्री. भगवान लक्ष्मण पाटील यांच्यामुळें माझ्यामध्यें निर्माण झाली. माझ्या साहित्य–क्षेत्रांतील कृतीचं बहुतांशीं श्रेय त्यांनाच आहे. श्री. गुरुवर्य पाटील यांचें माझ्यावर अतिशय प्रेम आहे. याचं लहानसं उदाहरण या ठिकाणीं दिलें तर तें अप्रस्तुत होणार नाहीं. कारण त्यामुळें जनतेचा गैरसमज दूर होईल. बंदीवानच्या पहिल्या प्रयोगाला श्री. पाटील हे हजर होते. त्यांनीं तो प्रयोग पूर्ण पाहिला व त्यांतील विनोदी पात्राच्या तोंडीं असलेलें ( अंक २ रा. प्र. २ रा मधील ) पद–प्रीत भरारी, मारूं ग रानीं, हें त्यांना आवडलें व त्यांनीं तें पद त्यांच्या ' जमीनदार ' या नाटकांत घातलें–सदर पद माझे मित्र मधुकर पोतदार व मीं मिळून दोघांनीं केलेलें आहे. त्यांनीं मला विचारलें कीं मीं हें पद घालू कां ?

मीं म्हटलें—साजून दिसल्यास घाला. कारण उत्तम कलावंताच्या कलामय कृतींत हें ओबडधोबड काव्य कसं काय दिसेल ?

त्यावेळीं मास्तरांनीं सहज हसत हसत उत्तर दिलें—

'वेड्या याचं उत्तर तूं किंवा मी देण्याऐवजीं रसिक प्रेक्षक व वाचक देतील !!

सांगायचा हेतू हा कीं माझ्या लिखाणाबद्दल मला जेवढी शाश्वती किंवा आत्मविश्वास नाहीं तेवढा त्यांना आहे. या पदाबद्दल पुष्कळ लोकांकडून विचारण्यांत आल्यामुळेंच मुद्दाम मीं हें नमूद केलें आहे.

हें नाटक रंगभूमीवर आणण्यासाठीं छाया नाटय–मंडळाचे संचालक श्री. विठ्ठलराव परब, दिग्दर्शक बी. एम. नागोटकर, श्री. रामचंद्रबुवा गोसावी, मॅनेजर एस्. गावडे, व नारायणराव कोठारे, दशरथ पांडुरंग वगळ, या मंडळींनीं बिनमोल साह्य केलें. त्याचप्रमाणें हें नाटक पुस्तकरूपानें जनतेपुढें आणण्याकरितां श्री. निंबकर यांनीं व पुस्तक सजावटीसाठीं ज्यांनीं आपले फोटो दिले व या नाहीं त्या प्रकारांनी ज्यांनीं मला साह्य केलें त्या सर्व उपकारकर्त्यांचा मी अत्यंत आभारी आहें. एवढें लिहून हे बंदीवानचे धागेदोरे पुरे करितों.

ता. ८।६।४८

मु. पो. अष्टमी<br>ता. रोहें.<br>जि. कुलाबा.

लेखक<br>**द्वा. पां. पोतदार**

## संगीत

# बंदीवान



## अंक १ ला



### प्रवेश १ ला



[ अविनाश शेतांत काम करून दमल्यामुळें एका धोंड्यावर बसला आहे. त्याच्या हातापायांना चिखल लागलेला आहे. जवळच कुदळ पावडं आहे. समय संध्याकाळ ]

**अविनाश :—** अहाहा ! किती नितांत वातावरण हें, जणूं सृष्टिदेवता आपल्या बाळाचे श्रम हरण करण्याकरितां मंद वारा घालून मंजूळ गाणें गात आहे. अशा जिकडे तिकडे आनंदाच्या स्वैर उर्मी उसळत असतांना माझ्याच अंतःकरणांत कां बरं सारखी कालवाकालव होत आहे ? हृदयाच्या दर्यांत गतस्मृतीचं वादळ सारखं थैमान घालीत आहे नी त्याच्या त्या गगनाशीं स्पर्धा करूं पाहाणाऱ्या लाटा, छाती रुपी किल्ल्याचा बुरुज ढासळून सप्तपाताळीं गडप करतात कीं काय, अशी मला भीति वाटूं लागली आहे ! हृदयांत भीषणतेनं नंगा नाच सुरू केला आहे ! ( थांबून ) हाच तो दिवस, आईविना पारख्या झालेल्या दोघां बहीण-भावंडांना, बाबांनीही मृत्युलोकची यात्रा संपवून या अफाट दुनियेंत सोडून दिलं ! जगांतील कोणत्याही तऱ्हेचा अनुभव मला नव्हता; बाबा असतांना मला जर कुणी विचारलं असतं, कीं जग म्हणजे काय ? तर त्यावेळीं जग म्हणजे सौख्याची फुलबाग आणि त्यांत विहार करणारे मानव म्हणजे फुलबागेंतल्या सुगंधमय वातावरणांत आनंदानं स्वैर विहार करणारे आनंदी भ्रमर असंच सांगितलं असतं ! पण आतां जर कुणी मला विचारील, तर स्वतःच्या अनुभवावरून मी सांगेन कीं जग म्हणजे वाळवंट आणि त्यांत वास्तव्य करणारे आम्ही शेतकरी, म्हणजे उन्हाच्या प्रखरतेनं, तापदायकतेनं पोळून निघणारे दुःखी मुसाफीर

असेंच सांगेन ! परमेश्वरा !! (विचारमग्न होतो. थोड्याच वेळानं सरला प्रवेश करते.)

**सरला** :—(त्याच्याकडे पाहून थोड्या वेळानं) कसल्या विचारांत दंग झाली आहे स्वारी ?

**अविनाश** :—कोण, सरल ? तूं केव्हां आलीस.

**सरला** :—ही आतांच आलें ! कसला विचार चालला होता एवढा ?

**अविनाश** :—विचार ? कसला असणार विचार दुसरा ? शेतकऱ्यांच्या भवितव्यतेचा ! सरला, आम्हां शेतकऱ्यांचें जविन फार खडतर आहे बरं ?

**सरला** :—म्हणजे मी नाहीं समजलें तुम्ही काय म्हणतां तें ?

**अविनाश** :—नाहीं, तुला तें कळणार नाहीं. बाबा असेपर्यंत मलाहि तें कळत नव्हतं, पण आतां मात्र पूर्णपणें कळतं आहे. (दगडावरून उठतो व हात झाडतो. त्या बरोबर त्याच्या हाताचा चिखल सरलेच्या अंगावर उडतो)

**सरला** :—इश्य, हें काय ? किती घाणेरडा स्वभाव आहे आपला, चिखल उडाला माझ्या अंगावर ?

**अविनाश** :—मग काय झालं त्यांत ?

**सरला** :—काय झालं ? कपडे मळले ना माझे ?

**अविनाश** :—अरेरे किती वाईट केलं मी, क्षमा कर हं मला !

**सरला** :—त्यांत काय क्षमा मागायची ?

**अविनाश** :—असं कसं म्हणतेस, आपल्यासारख्या श्रीमंताच्या मुलीचे कपडे माझ्यासारख्या क्षुल्लक शेतकऱ्याच्या हातून चिखल उडून मळले जावेत, आणि एवढा मोठा गुन्हा मी केला असतांना क्षमा मागूं नये ? खासा न्याय.

**सरला** :—छे, मुळींच नको.

**अविनाश** :—कां नको ? अग मी शेतकरी म्हणजे एक क्षुल्लक प्राणी आहे.

**सरला** :—शेतकरी क्षुल्लक ? साऱ्या जगाला अन्न देणारा शेतकरी क्षुल्लक कसा ?

**अविनाश** :—कसा तें नाहीं कळणार, पण या सावकारी जगांत सावकारांना तरी आज हा शेतकरी क्षुल्लक वाटतो आहे खरा.

**सरला** :— मला नाहीं वाटत.

**अविनाश** :— ( थोडा विचार करून ) खरंच ! तुला नाहीं वाटणार तसं ! पण शेतकरी, कुत्र्याच्या मोलानं आयुष्य कंठतो आहे याची तुला थोडी तरी कल्पना आहे कां ?

**सरला** :— काय म्हणतां आपण ? शेतकरी कुत्र्याच्या मोलानं आयुष्य कंठतो ?

**अविनाश**:—होय, शेतकऱ्याला किती हीन तऱ्हेनें आयुष्याचे दिवस घालवावे लागतात, याची तुला कुठून कल्पना येणार ? तूं सदा आनंदानं खावं, प्यावं, मऊ गादीवर लोळावं आणि गमतीदार कादंबऱ्या वाचून आपलं मन रमवावं या व्यतिरिक्त जगाची तुला काय माहिती आहे ? सरल, शेतकरी मरमर मरतो, कष्ट करतो, जिवाची तमा न बाळगितां शेताची निगा राखतो ! त्याच्या भोळ्या मनाला शेत पिकल्यावर, शेतामध्यें पिवळी संपत्ती निर्माण झाल्यावर अतिशय आनंद होतो. ही संपत्ती थोड्याच दिवसांत आपल्या घरीं जाऊन पडणार, आपण सुखानं दिवस काढणार असे आशेचे मनोरे, त्याच्या डोळ्यां-समोर उभे राहातात. पण मळणी निघते न निघते तोंच सावकार हजर होतो. बिचाऱ्या शेतकऱ्यानें रक्ताचें पाणी करून पिकवलेलें बहुमोल धान्य सावकार कशाही तऱ्हेचा, त्या शेतकऱ्याच्या पोटाचा सुद्धां विचार न करतां खुशाल आपल्या घरीं नेतो; आणि शिल्लक राहिलेलें धान्य बिचाऱ्या शेतकऱ्याला दुःखी मनानं वाहून आपल्या घरीं आणावं लागतं ! त्या धान्यावर त्याचे बारा महिन्या-पैकीं अवघे दोन महिने जातात, आणि नाइलाज म्हणून त्याला दहा महिने सावकाराकडे दात विचकण्याची पाळी येते. सरल, अशा रीतीनें सावकाररूपी काळ शेतकऱ्याच्या आशेचे मनोरे ढासळून जमीनदोस्त करितो, पहा. जो शेतकरी जगाच्या पोटाची तजवीज करितो, त्याला आपल्या पोटाकरितां दुसऱ्या-कडे हात पसरण्याची पाळी येते.

**सरला** :— खरच कां ही अशी स्थिति आहे ? जो जगाच्या अन्नाची बेगमी करितो, तोच त्या अन्नाला मोताद होतो, हा जगाचा उलटा न्याय मला नव्हता माहीत ! !

**अविनाश** :— आतां तरी माहीत झाला ना ! मग कां बरं मला तूं क्षुल्लक लेखणार नाहींस.

**सरला** :— तसा नव्हता माझ्या म्हणण्याचा हेतू ! खरच माझं म्हणणं तसं नव्हतं, कांहीं तरी समज करून घ्यायचा हें बरं नव्हे !

**अविनाश** :— खरं आहे तें, मी कुठं आहे एवढा विद्वान, तुझा हेतू ओळखण्याइतका !

**सरला** :— नको कांहीं असे अन्योक्तीनं टोमणे मारायला !

**अविनाश** :— मी टोमणे मारले तरी ते कोण ऐकून घेणार ?

**सरला** :— अहाहा ! काय पण, भोळे सांबच की नाहीं ! जसं कळतच नाहीं कांहीं !

**अविनाश** :— सरल, आम्हांला कितीजरी कळत असलं तरी या सावकारी जगांत, आमच्यासारख्या गरीब-पैशाविना कंगाल असलेल्यांचें ज्ञान, मातीमोल ठरलं जातं ? त्याची योग्यता पैशाच्या पापी कृतीनं पायाखालीं तुडविली जाते ! गरिबींत आयुष्य कशारीतीनं काढावं लागतं त्याची तुला जाणीव नाहीं ! गरीब शेतकऱ्यांना दिवसाचे दिवस पुरेशा अन्नावांचून घालवावे लागतात

**सरला** :— म्हणजे आपणही अर्धपोटी राहून दिवस काढतां ? अविनाश, मला अगोदर कां नाहीं सांगितलंत, तुम्हाला मी अशा स्थितींत मुळींच राहू दिलं नसतं !

**अविनाश** :— काय केलं असतस ?

**सरला** :— काय केलं असतं ? आबांना सांगून मी आपल्याला आमच्याकडे ठेवून घेतलं असतं !! ( थोडा वेळ थांबून नंतर ) पण—

**अविनाश** :— पण काय ? बोल पण कुठं आला ?

**सरला** :— आमचे कारकून, आहेत तुम्हाला माहीत ?

**अविनाश** :— तुमचे कारकून, कोण, सुधीर ?

**सरला** :—होय, तेच आहेत आमच्याकडे कारकून ! आणि त्यामुळेंच तर माझा नाइलाज आहे.

**अविनाश** :— नको सरल, कांहीं करूं नकोस तूं माझ्याकरितां

**सरला** :—कां ? आपणाला अशी दुःखांत टाकून स्वतः सुखोपभोगांत दिवस घालवणें हें शक्य तरी आहे कां मला ?

**अविनाश** :— तुला कां माझ्याबद्दल इतकी हळहळ वाटते ? नको तूं आपल्या

मनाला मुळींच वाईट वाटून घेऊ नकोस ! आम्हा शेतकऱ्यांचें जीवन असेंच कष्टांत जायचे !

**सरला** :— नाहीं, तशा स्थितींत मी आपणाला मुळींच राहूं द्यायची नाहीं. अविनाश ( गळ्यांतील सोन्याची माळ काढून ) ही घ्या, कुठं तरी विका, यावर थोडे दिवस काढा, पुन्हां मी पैसे आणून देईन !

**अविनाश** :— ( माळ न घेतां ) छे-छे, सरल, या अविनाशच्या मानी-मनाला ही गोष्ट केव्हांही रुचणार नाहीं; नको मला तुझी माळ. तुझ्या माळेनं फार तर मी दोन महिने सुखानं राहूं शकेन, नव्हे तूं मला नेहमीं पोसूं शकशील पण मला तुझ्याकडील कांहींहीं नको. तुम्हा सावकारांकडील एक पैसुद्धां मला नको, ती पचणार नाहीं ! कारण हा एवढा मोठा दागिना घेऊन जर मी बाजारांत विकावयास गेलों, तर माझ्यासारख्या कंगालाजवळ ही सोन्याची माला पाहून लोकांना संशय येईल आणि हा दागिना सावकारांकडील आहे, असं कळल्या नंतर मला बिन-भाड्याच्या खोलींत अगदीं निमूट जावं लागेल ! माझे हात लोहशृंखलेनं बद्ध होतील ! मग ती शृंखला सरल, मला कशी तोडतां येईल ? मी कैदी होईन, आणि शिवाय शेतकऱ्यांच्या रक्तानं रंगलेला पैसा घेऊन मी माझं आयुष्य कंठूं ! नाहीं होणार हें माझ्या हातून; मी एकटा जेवलों, माझ्या जिवाची शांतता झाली म्हणजे सगळे शेतकरी शांत होतील काय ? त्यांची क्षुधा शमली जाईल कां ? आणि शिवाय मी गरीब शेतकऱ्यांचा पुढारी म्हणून मिरवीत असतांना, शेतकरी बंधूच्या स्वत्वावर घाला घालून, स्वार्थांध बनून मी आनंदानं राहूं काय ? नाहीं, नाहीं हें कसाब कृत्य माझ्या हातून कालत्रयीं होणार नाहीं.

### पद

**अदय ना करि कृतीला ।**
**हीन भाव वसत कसा ॥ धृ० ॥**
**स्वार्थी नच कधीं मोहोनी ।**
**परासी दुःखा पद पथीं ठेवी ॥ १ ॥**

**सरला** :— म्हणजे, सावकारी पैसा गरिबांच्या माना पिळून मिळविलेला असतो ?

**अविनाश** :— होय. गरिबांच्या माना पिळून मिळविलेला असतो. निरक्षर निरापराधी शेतकऱ्यांना पिळून मिळविलेला असतो, गरिबांचा घाम तोच सावकारांचा दाम बनलेला असतो. त्या पैशावर पापांची भयंकर इमारत उभारून सावकार आनंदानं आयुष्य कंठीत असतो. त्या इमारतींत राहणाऱ्या, पापाचा परमेश्वर बनलेल्या सावकाराच्या आश्रयानं मी माझं जीवित घालवूं? नको सरले ती तुझी माळ मला नको. तिच्या स्पर्शानं सुद्धां आम्हां शेतकऱ्यांचा सत्यानाश व्हायचा. माझ्याबद्दल तुझ्या हृदयांत जिवंत सहानुभूति वास्तव्य करते आहे, हें पाहून मी स्वतःला धन्य समजतों.

**सरला** :— सावकारी संपत्ती अशा पापी कृत्यांनीं जन्माला येते हें मला आज कळलं. अविनाश, मी आजपासून आपल्या शेतकरी संघाला जातीनं वाहून घेतें आहे! तुम्हाला माझ्याकडून होईल तेवढी मदत करायला मी तयार आहे.

**अविनाश** :— सरल, असं केल्यानं तुला फार त्रास सोसावे लागतील, पहा विचार कर, भिडेला बळी पडून तूं आपल्या जिवाचं, आयुष्याचं मातेरं करून घेऊं नकोस.

**सरला** :— आपल्या चरणांना स्मरून सांगतें कीं मी आपली दासी आहें. आपणाकरितां हा देह जरी नाश होण्याची पाळी आली तरी हीं सरला कधींही मागें येणार नाहीं. अविनाश, मी सावकाराची मुलगी असलें तरी माझं अंतःकरण सावकारी काव्यानं भरलेलं नाहीं तर तें शुद्ध नीतीनं भरलेलं आहे, असं जगाला मला पटवून द्यायचं आहे.

**अविनाश** :— अहाहा! सरले तुझं अंतःकरण थोर आहे, माझ्या उच्चतम कार्याला तुझी पूर्ण संमती मिळाल्यामुळें माझ्या अंगांत नव-चैतन्य संचारूं लागलं! या मावळत्या सूर्याला साक्षी ठेवून सांगतों कीं तूं आजपासून माझी झालीस! तुझ्या प्रोत्साहन-दायक वाणीनं मी माझं ध्येय पूर्ण करून, जगाला एक धडा घालून देईन! साऱ्या जगाला शेतकऱ्यांच्या निर्मळ, परोपकारी मनाची जाणीव करून देणारा, निढळाच्या घामानं भिजलेला चिखलरूपी कस्तुरीचा टिळा, माझ्या प्रेमाची साक्ष म्हणून मी तुझ्या कपाळीं लावतों. (सरलेच्या कपाळीं टिळा लावतो)

**सरला** :— अहाहा ! धन्य झालें मी, अविनाश—

**पद**

**ना मानसीं मावे हर्ष हा ।**
**पावन झाली जगतीं दुहिता ।**
**तव पदीं मम अजी वाहित काया ॥ धृ० ॥**
**नच दुजा तव-विण मज जगीं थारा ।**
**दाह हारी हा मनिचा भाव खरा ॥ १ ॥**

( एकमेकांकडे प्रेमभरीत नेत्रानं पहात असतात. आंतून दादा, दादा अशी हांक मारीत सुमती प्रवेश करिते )

**सुमती** :—दादा ! दादा ! संध्याकाळ झाली. यायचं नाहीं कां अजून ? कोण सरल, तूं कशी बाई इथं ? श्रीमंतांनी आमच्यासारख्या गरिबांककडे येऊं नये हो !

**सरला** :— सुमती, गरीब नी श्रीमंत हा भेद मजजवळ आतां उरला नाहीं. मला आतां गरीबीची पूर्ण जाणीव झाली आहे, त्याची साक्ष माझ्या कपाळा-वरील हा टिळा देतच आहे ! या पुढें असंख्य लुळ्यापांगळ्यांची सेवा करण्यांत हा देह झिजविणं हेंच या सरलेचं आद्य ध्येय ! !

**सुमती** :— बरं, बरं, आधीं घरांत चल, चलरे दादा. ( जातात

---

## प्रवेश २ रा



( आबासाहेबांचा वाडा, दिवाणखान्यांत आबासाहेब पुस्तक वाचीत बसले आहेत. जवळच सुधीर जमाखर्च लिहीत बसला आहे. )

**सुधीर** :— ( कांहीं आठवल्यासारखें करून एकदम ) आबा, आपण मागें म्हणाला होतात, तें आठवतं कां आपल्याला ?

**आबासाहेब** :— काय म्हणालांत सुधीर ?

**सुधीर** :— नाहीं; म्हटलं तुम्हीं मागें बोलला होतात तें आठवतं कां तुम्हाला ?

**आबासाहेब** :— काय बरं म्हणालों होतों मी ! (विचार करून) नाहीं बुवा आठवत मला !

**सुधीर** :— मागें म्हणत नव्हतां आपल्या आनंदरावाच्या लग्नासंबंधीं !

**आबासाहेब** :— (रागानें) कुणाच्या ? त्या कारट्याच्या ? त्याचं नांवसुद्धां काढूं नका माझ्या समोर ! असलं कारटं जन्माला आलं नसतं तर बरं झालं असतं !

**सुधीर** :— आबा कां रागावतां त्यांच्यावर ? काय असं आनंदरावांनीं केलं आहे ?

**आबा०** :— काय केलं आहे, काय करायचं बाकी ठेवलं आहे म्हणा ना ? त्याच्यासंबंधीं लोकांचं गांवांत काय मत आहे तें माहीत आहे ना तुम्हाला ? आणि इतकं माहीत असूनही वर तोंड करून तुम्ही विचारतां ? काय म्हणावं तुम्हाला सुधीर ?

**सुधीर** :— खरं आहे तें, आनंदरावांची असेल थोडीफार चूक ! मी नाहीं म्हणत नाहीं पण त्यांतल्या बऱ्याचशा गोष्टी खोट्या आहेत, पराचा कावळा केला आहे लोकांनीं !

**आबा०** :— अस्सं ! एकूण तुम्हाला आनंदाबद्दल बरीचशी आपुलकी वाटते म्हणायची ! सगळे लोक मूर्ख आहेत, आणि हाच काय तो एकटा अकलेचा खंदक आहे ! ज्या गोष्टीबद्दल नुसता विचार केला तरीसुद्धां आमच्या श्रीमंतीला बट्टा लागेल असल्या गोष्टी त्यानं केल्या तरीही तो सज्जन ! त्याच्या या कृत्यांनीं आम्हालां गांवांत तोंड काढायला जागा ठेवली नाहीं. आणि तुम्ही म्हणतां त्याचं लग्न करा. याच्यासारख्या दिवट्याला मुलगी द्यायला मुलींचे बाप कांहीं महामूर्ख नाहींत, समजलांत !

**सुधीर** :— पण त्यच लग्नत केलंत नाहीं तर, हा संसारांत अंधार पडला आहे त्याचं कसं होणार ? आपण रावबहादूर अहांत ! आपल्याकडे मोठमोठी मंडळी येणार, निदान घरांत सुवाशीण तरी पाहिजे ना ?

**आबा०** :— मग त्याचंच लग्न कशाला करायला पाहिजे ? मी कांहीं मेलो नाहीं, माझं कांहीं वय झालं नाहीं अजून !



**आबा :**— आजपर्यंत तूं मला पैसे दिलेस त्याची पोंचपावती आहे का तुझ्याजवळ ? [ पृ. २० ]

**सुधीर** :— म्हणजे.........

**आबा०** :— म्हणजे काय ? यांत कांहीं विशेष नाहीं ! आमच्या सावकार घराण्याची ही परंपरा आहे ! अहो मीच काय माझ्या आजोबांनी माझ्याही पेक्षां वृद्ध वयांत लग्न केलं होतं ! आणि त्याच संबंधीं मी तुम्हाला विचारणार होतों ! तोंच तुम्ही हा विषय काढलांत.

**सुधीर** :— पण आबा, आपणाला मुलगी.........

**आबा०** :— काय मला मुलगी मिळणार नाहीं, अहो पैसा असल्यानंतर काय होऊं शकणार नाहीं; साऱ्या जगाची उलथापालथ करतां येत !

**सुधीर** :— तें खरं, खरं आहे ( थोडा विचार करून कावेबाजपणानें ) हो, आबा मला एक कल्पना सुचली आहे. अगदीं कुठं जायला नको आपणाला ! आपल्याकडे अविनाश होता ना त्याची बहीण उपवर आहे. शिवाय त्याची परिस्थितिही हलाखीची आहे ! तेव्हां द्या थोडेफार पैसे, होईल कबूल बहीण द्यायला, आपल्या बोलण्यापलिकडे जाणार नाहीं तो.

**आबा०** :— अहो माझं जरी ऐकलं नाहीं, तरी त्याचं तोंड बंद करायला पैशाच्या पिशवीचें तोंड उघडलं कीं झालं.

**सुधीर** :— तें खरं आहे ! पण समजा त्यानं बहीण द्यायचं नाकारलं तर ! कारण तो सुशिक्षित असून नवमतवादी विचारांचं वादळ थैमान घालीत असणार त्याच्या डोक्यांत, मग काय करायचं ?

**आबा०** :— म्हणे काय करायचं ? काढायचं बापाच्या वेळचं कर्ज आणि बनवायची बनावट प्रॉमिसरी ! देवघेवीचे व्यवहार आमचे होत असल्यामुळें त्याच्या बापाची सहीही आहे मजजवळ. त्या सहीप्रमाणें करावयाची सही आणि तीन वर्षांच्या आंतील वर तारीख घालायची. बाप वारल्याला अवघीं दोन वर्षें झालीं आहेत, तो दिवसही आहे माझ्या लक्ष्यांत. अहो त्या दिवशीं आपल्या विश्वेश्वराची यात्रा होती ! एवढा मोठा अविनाश झाला आहे, पण बापाच्या व्यवहाराची मुळींसुद्धां दाद नाहीं त्याला ! सुधीर, संध्याकाळपर्यंत ही प्रॉमिसरी लिहून काढा ! आणि नंतर अविनाशला बोलावून आणून, या पैशा-संबंधीं त्याच्याजवळ मागणी करा. व हळूच मग बोलतां बोलतां त्याच्या बहिणीच्या लग्नासंबंधीं बोलणं काढा, कीं आपोआपच कर्जापायीं तरी त्याला

हो म्हणणं भाग पडेल. आणि त्यांतूनही नाहीं ताळ्यावर आला, तर पुढील कायदेशीर इलाज त्याच्यापुढं दत्त म्हणून उभा करायचा, मग पाहूं कसा कबूल होत नाहीं तो ?

**सुधीर** :— खरं आहे आबासाहेब !

**आबा०** :— खरं (हांसून) खरं काय म्हणतां ? अहो खोट्याचं खरं केलं आहे, हा सावकारी कावा आहे ! या सावकारी काव्यापुढं तुमचा कारकुनी कावा फिकाच पडायचा ! ( इतक्यांत रामजी प्रवेश करतो )

**सुधीर** :— ( रामजीला तसाच थोडा वेळ उभा ठेवून त्याच्याकडे तुच्छतादर्शक पहात ) आबा, रामजी आला आहे.

**आबा०** :— ( आढ्यतेनें ) होय, पाहिला मी त्याला, कायरे उभा कां असा बावळटासारखा ? कां बोलत कां नाहींस ( कांहीं बोलत नाहीं असं पाहून ) कां ऐकूं येत नाहीं ? कान फुटले कीं वाचा बंद झाली तुझी ?

**रामजी** :— ( घाबरत ) नाहीं, आबासाहेब गरिबावर दया करा, तुम्हींच आमच्यावर असे रागावूं लागलांत तर आम्ही कुणाच्या तोंडाकडे पाहायचं ? आबासाहेब, मी अगदी दारिद्र्यानें गांजलों आहें, पोट भरण्याची पंचाईत आहे.

**आबा०** :— दारिद्र्यानें गांजलों आहें, पोट भरत नाहीं म्हणे ! पोट भरत नाहीं तर कांटे भरावें पोटांत.

**रामजी** :— असं काय म्हणतां आबा ? चालण्याची सुद्धां मला ताकद नाहीं ! काय करावं आम्ही अशा वेळीं.

**आबा०** :— सुधीर पाहिलंत कां कसा बोलतो आहे तो ? हा सारा पैसा बुडविण्याचा कावा बरं ! पण रामजी याद राखून ठेव मी कांहीं दूधखुळा नाहीं, तुझ्या या बतावणीला फसायला ! तुझ्या बापाकडून पैसे वसूल करीन, तूं काय मला बावळट समजलास होय ?

**रामजी** :— पण आबासाहेब, मी तुमचे पैसे बुडवितों आहे असं थोडंच आहे ? माझी एवढींच विनंती आहे कीं मला थोडीफार सूट द्या.

**आबा०** :— सूट द्या, किती म्हणून सूट द्यायची ? प्रत्येक वेळेला तुमची ही अशी गाऱ्हाणीं ! तुम्हाला वेळेला आम्ही उपयोगीं पडतों हीच आमची चूक,

हाच आमचा मूर्खपणा !! आम्ही हाडांचीं काडं करून मिळविलेली ही संपत्ती तुमच्याकरितां काय नाहींशीं करावी होय ?

**रामजी** :— आबासाहेब दया करा गरिबांवर ! जन्मो जन्मी विसरणार नाहीं आपले उपकार !

**आबा०** :— दिसतं आहे तोंड, उपकार न विसरणाराचं ! म्हणे जन्मोजन्मी विसरणार नाहीं. या जन्मी त्रास देतां अहांत तो काय थोडा आहे ? तुमच्यावर उपकार करून, माझी सारी संपत्ती खलास करायला मी आजच कांहीं गळ्यांत रुद्राक्षाच्या माळा घातल्या नाहींत ! कांहीं नाहीं, एक पैही सुटली जाणार नाहीं तुला !

**सुधीर** :— बरोबर, खरं आहे तें ! आबा हा रामजी अगदीं बदमाष आहे, असल्या ठकांना कां म्हणून सूट द्यायची ! पहा कसं थोतांड केलं आहे त्यानं ! एक छदामही सोडूं नका याला.

**रामजी** :— कारकून साहेब कां उगाच माझ्यावर रागावतां ? माझ्यासारख्या गरिबावर हे असं कां बर कुभांड रचता ?

**आबा** :— असं ! बोलायला तरी कांहीं शरम वाटते कां ? तुझ्या बापाचे आम्ही काय देणेकरी लागत होतो तुला पैसे द्यायला, तें कांहीं नाहीं, पैसे केव्हां देणार बोल ?

**रामजी** :— देईन लवकरच देईन, एव्हांना सारे पैसे चुकते केले असते, पण आमच्यावर कशी संकटपरंपरा कोसळत आली आहे, ती माहीत आहे ना तुम्हाला ? गेल्या वर्षी ती वारली, यंदा मुलगा वारला, औषधाला पैसा थोडा कां लागतो ? पण पैसा खर्च करून मुलगा हातीं लागला असता तर त्यांनीं माझा काळ तरी फेडला असता, पण नाहीं. पैशापरी पैसाही गेला, नी पोराचा प्राणही नाहीसा झाला. काय बोलायचं आपलं नशीब ( कपाळावर हात मारतो ) आबासाहेब इतकं होऊनही मी आपणाला पैसे देतो आहे. पण माझ्यावर दया करून थोडीशी सूट द्या मला. कारण तशांतही माझा लहान मुलगा आजारी आहे.

**आबा०** :— असला तर मला काय त्याचं ? मरेना तुझा कारटा !

**रामजी** :— नका आबासाहेब, असलं अभद्र बोलूं नका ! माझा गरिबाचा एकुलता एक मुलगा त्याच्या जिवावर कां उठतां, मला पाहिजे ते बोला, हवं असल्यास मारा पण माझ्या मुलाबद्दल कांहीं वेडेवांकडे बोलूं नका हो.

**आबा०** :— कां ! अरे तुला स्वतःचें पोट भरतां येत नाहीं तर मुलांची ब्याद तरी कशाला हवी होती, मरुंदे त्याला ! गरीबांना मुलं होणं म्हणजे पाप असतें !

**रामजी** :— ( रागानें ) आबासाहेब गरिबांना मुलं होणं पाप असतं आणि श्रीमंतांना होणं म्हणजे पुण्य होय ? श्रीमंत मनुष्य असतात, नी गरीब म्हणजे तुम्ही काय पशू समजतां ! तुमच्याप्रमाणेंच गरिबांना हृदय असतं !

**आबा०** :— वा, फार बोलूं लागलास तूं ? गरीब जरी मनुष्य असला तरी आम्ही सावकार त्याला पशू प्रमाणेंच लेखतों ! आम्ही सांगूं त्याप्रमाणें त्यानें वागलें पाहिजे, तें कांहीं नाहीं एक पै सुद्धां सूट मिळणार नाहीं.

**रामजी** :— माझ्या मुलांकडे तरी पहा, सारखा तळमळतो आहे औषधाविना !

**आबा०** :— पुन्हा आपलं तेंच, मरूदे तुझा तो कारटा ! प्रथम माझे पैसे आण.

**रामजी** :— आबासाहेब, एका लहान मुलाची सुद्धां तुम्हाला दया येत नाहीं ना ? तो मरून तुमचा काय फायदा होणार आहे ! तो गरिबींत जन्माला आला हा काय त्याचा गुन्हा आहे ? समजा, त्या ठिकाणीं तुमचा मुलगा असता तर ?

**आबा०** :— चूप, तो श्रीमंताचा मुलगा आहे ! श्रीमंताचीं मुलं झोपडींत जन्माला येत नसतात, मी तुझ्यासारखी लाचारी करायला गेलों नसतों कुणीकडे ? तुझा मुलगा उद्यां मरण्यापेक्षां आज मेला तर मला काय त्याचं ?

**रामजी** :— ( त्वेषानें ) खबरदार, एक शब्द पुढं बोलाल तर ! तुम्हा सावकारांचं हृदय खरोखर पाषाणाचं असतं. त्यांत मार्दवतेचा एकही कण नसतो ! तुमचे पैसे तुम्ही घ्या पण त्याच्याबद्दल अनुदारपणाचा एक शब्दही उच्चारूं नका ! तुम्हाला असं वाटत असेल कीं गरिबांना अंतःकरण नसतं ! पण तो तुमचा भ्रम आहे, गरींबाचं हृदय मार्दवतेनं पूर्ण भरलेलं असतं तुम्हा सावकाराप्रमाणें पाषाणाचं बनलेलं नसतं !

**आबा०** :— ( हसून ) हो, खरं आहे तें. सावकाराला आपलं हृदय पाषाणांचचं करावं लागतं ! बोल किती पैसे आणले आहेस ? पैसे ठेव इथं मग होऊंदे तुझं व्याख्यान ! ( रामजी पैशांची पिशवी आबासाहेबा पुढें ठेवतो. आबासाहेब ती सुधीरकडे देतात. )

**सुधीर :—** ( पैसे मोजून ) अवघे पाऊणशेंच रुपये आणले आहेत !

**आबा० :—** म्हणजे याचा अर्थ काय ? जसे काय आम्हाला धर्मच करतो आहे हा ? कायरे बाकीचे पैसे केव्हा देणार ?

**रामजी :—** म्हणजे एकंदर पैसे तरी किती आहेत माझ्यावर ?

**आबा० :—** किती म्हणजे ? आठवत नाहींत ? पैसे नेताना मात्र गोड बोलत होतास नी आतां कां असं ? सुधीर किती येणं आहे याच्याकडे; हिशेब काढा पाहूं.

**सुधीर :—** ( वही तपासून ) रामजीकडे एकंदर व्याज मुदलासह एकशें सत्तेचाळीस रुपये सव्वातेरा आणे होतात !

**रामजी :—** ( आश्चर्यानें ) काय एवढे रुपये ? आणि मागं दिले ते ?

**आबा० :—** अरे मागें दिलेस ते व्याजांत नाहीं कां मुरले ? आणि पुन्हां मागचें गातोस अजून ?

**रामजी :—** पण त्या वेळीं सुद्धां जवळ जवळ इतकेच होते; आणि आतां सुद्धां तोच आंकडा !

**आबा० :—** म्हणजे तुला काय वाटतं, तुझे आम्ही पैसे खाल्ले ? बोलतांना विचार कर, पैशांचं व्याज मुद्धां नको भरायला ! ती सोंगं नको आहेत, सारे पैसे घेऊन ये आणि ही प्रॉमिसरी फाडून ने.

**रामजी :—** म्हणजे आणखी किती पैसे द्यायला पाहिजेत ?

**आबा० :—** आणखी एवढेच द्यायला पाहिजेत तेव्हां तुझं कर्ज फिटलं जाईल ! होय ना सुधीर ?

**सुधीर :—** होय ! एवढेच पाहिजेत यायला !

**रामजी :—** आणखी एवढेच पाहिजेत ? आबासाहेब, मी अगदींच कांहीं अक्कल मंद नाहीं, मला थोडंतरी कळतं, परिस्थितीनं मी गांजलों आहें. परिस्थितीच्या भोंवऱ्यांत सांपडल्यामुळें त्यांतून निभावून जाण्याकरितां तुमच्याकडील, कर्जाचा हात मला धरावा लागला, त्या स्थितींत मी भांबावल्यामुळं तुमच्या भूलथापांना मीं बळी पडलों आणि तुमच्या म्हणण्याप्रमाणं कोऱ्या कागदावर सही करून दिली ! तुमच्याकडून अवघे मी शंभर रुपये नेले. आतांपर्यंत सव्वाशें रुपये मी तुम्हाला दिले तरीसुद्धां तुमचं देणं आहे कां ? गरीबाला पिळतांना

विचार करा. आपल्या स्वार्थाकरितां तुम्ही किती तरी अडलेल्या जिवांचे तळतळाट घेतां अहांत याची तुम्हाला जाणीव नाहीं ! गरीबांना छळून काय मिळणार आहे ? नरकाचे वाटेकरीच होणार आहांत तुम्ही ! ! जातो मी. माझं कर्तव्य केलं. तुमच्या कर्जांतून मी मोकळा झालों आहे ! याव्यतिरिक्त तुम्हाला जें काय करावयाचें असेल तें करा. यापुढं माझ्याकडून तुम्हाला एक दमडीही मिळणार नाहीं.

**आबा०** :— दमडीही मिळणार नाहीं ? चामडी लोळवीन ! जसे काय चोरून पैसे आणले होते आम्ही, तुम्हां हरामखोरांना वाटायला !

**रामजी** :—खबरदार हरामखोर म्हणाल तर ! हरामखोर असतो तर तुमच्या दाराशीं असे पैसे घेऊन आलों नसतों !

**आबा०** :—फार लांब होत चालली तुझी जीभ ! थोडी आवर तिला, म्हणे कर्ज देणार नाहीं; तुझ्या पितराकडून वसूल करीन ! जोपर्यंत प्रॉमिसरी फाडली नाहीं, तोपर्यंत तुझ्या बापाकडून फेड करून घेईन, समजलास ! आजपर्यंत तूं मला पैसे दिलेस त्याची पोंच पावती आहे कां तुझ्या जवळ ? ( थांबून ) बोल; कां बोलत नाहींस ? झाल्या सगळ्या वल्गना बंद ! म्हणे पैसे देणार नाहीं !

**रामजी** :— माणूस आहे कां कोण आहे हा ? काय करूं रे ? अखेर सावकारी पाशांत मी अडकलों हं ! आतां माझं डोकं फिरूं लागलं ! सावकार–सावकार म्हणजे गरिबांचा कर्दनकाळ, राक्षस ! ( वेड्यासारखं ) हें काय ? अरे बापरे एवढं कर्ज–एवढं कर्ज माझ्यावर–एवढं कर्ज मी कसं फेडणार ? हायरे दैवा–देवा ( घेरी घेऊन पडतो. )

**आबा०** :— पहा कसं करतो ढोंग ! त्या कोकिलेला म्हणावं पहा हे आपल्या बापाचं सोंग ! सुधीर कोकिला आहे कां इथं ?

**कोकिला** :— ( एकदम प्र. क. ) कोण बाबा ? काय झालें ? ( त्याच्या जवळ जाऊन ) बाबा, बाबा, हें एकदम कसे पडले हो आबासाहेब.

**आबा०** :—काय झालं आहे त्याला ? कर्ज द्यायला नको म्हणून ढोंग केलं आहे त्यानं ! मार लाथ एक कंबरड्यांत म्हणजे आतां येईल शुद्धीवर ! म्हणे कसे पडले ? ढोंग करायला सांगावं लागत नाहीं.

**कोकिला** :— गप्प बसा आबासाहेब. तुम्हा श्रीमंतांना दुसऱ्याबद्दल कांहींच कां वाटत नाहीं ? या ठिकाणीं तुम्ही असतां तर सारं गांव एक केलं असतंत.

**आबा०** :— बस कर तुझी चर्पटपंजरी ! मला शिकवतेस तत्त्वज्ञान. त्या थेरड्याला घे नि इथून एकदम काळं कर.

**कोकिला** :— नाहींच यायची पुन्हा आतां ! अजूनपर्यंत मला अनुभव नव्हता, तुम्हा सावकारांचं घर म्हणजे जहाल विषाचं आगर आहे हें. आतां कळलं. इथं आल्याबरोबर बाबांना पहा कशी बाधा झाली ती. बाबा–बाबा ( रामजी शुद्धीवर येतो. त्याला कोकिला उठवते. )

**आबा०** :— चूप, थोबाड रंगवून टाकीन. मस्तवाल कारटी, चल चालती हो.

**कोकिला** :— आबासाहेब, आमचा विनाकारण छळ कां मांडला आहे तुम्ही. पण लक्षांत ठेवा आम्हां गरीबांच्या तळतळाटांतच तुम्हा दुर्जनांचा सत्यानाश आहे !

**रामजी** :— चल पोरी त्या खाटकाबरोबर काय बोलतेस ( जातात )

**आबा साहेब** :— ( तीं दोघें गेली त्या दिशेला पहात ) बेमुर्वतखोर पोरटे मी नांवाचा सावकार आहे हें विसरूं नकोस. सुधीर जरा आंत चला पाहूं, मला तुम्हांला कांहीं सांगायचं आहे. (जातात. तो पसारा वगैरे तिथेच पडलेला असतो. थोड्या वेळानें आनंद आस्ते आस्ते पावलं टाकीत प्र. क. )

**आनंद** :— ( निरखून पहातो ) गेले, अगदीं, पार गेले, आतां येतीलसें दिसत नाहींत ! इतक्या वेळांत मला माझा कार्यक्रम आटोपलाच पाहिजे ! आजच्या दिवसांत त्या बयेचें तोंड बंद केलं नाहीं तर ती आबांकडे येईल आणि ती इथं आली म्हणजे मग मात्र माझी कांहीं खैर नाहीं ( खिशांतून चाव्यांचा जुडका काढतो व तिजोरीला लावून त्यांतील पैसे काढून ती पुन्हा लावतो ) बस, झालं माझं काम !! आतां साऱ्या आयुष्यभर चैनच चैन !! या आनंदाचा आनंद अनिवार झाला आहे ! हा आनंद साऱ्या आयुष्यभर आनंदीच राहणार !! ( निघून जातो ) ( पडदा पडतो. )

---

## प्रवेश ३ रा



( रस्ता–वसंत रस्त्यांत फेऱ्या घालतो आहे )

**वसंत** :—परमेश्वराची लीला अतर्क्य आहे बुवा ! त्यानं ही स्त्री जात निर्माण केल्यामुळें आम्हां प्रेमवीरांना प्रेमी ललनांच्या दर्शनानंच स्वर्ग प्राप्त होतो ! स्त्री जात म्हणजे आजच्या जगांत तरुणांना मोहीत करणारी अजब मोहिनीच; माझी कोकिलाच पहाना ! तिचं नांव घेतांच अंगांत, नसनसांत प्रेम-संचार सारखा थैमान घालूं लागला ! कोकिला, कायतर कोकिला ! किती नांव गोड आहे. कां बरं येत नाहीं माझी कोकिला ? ( सिगारेट शिलगावतो, कोकिला ज्या बाजूनें येत असते तिकडेच फवारे सोडतो )

**कोकिला** :— ( हातानं धूर घालविण्याचा प्रयत्न करीत लटक्या रागानं ) अहो राजश्री आपल्याला शिष्टाचार तरी कळतो कीं नाहीं ? घटिंगणासारखे काय करतां असे ?

**वसंत** :— ( आं करून ) आं, अशी एकदम शिव्यांची खरपूस मेजवानी कां देतेस मला ? मी कोण आहे हें ओळखलंस कां ?

**कोकिला** :—हो, ओळखलं हो ! आ करून काय पहातां माझ्याकडे ? कांहीं शरम आहे कीं नाहीं मनाला ?

**वसंत** :—शरम आणि ती मला ! वेडी आहेस झालं ! कोकिले जातीवंत प्रेमाकरितां राजरस्त्यावरच काय वाटेल त्या ठिकाणीं जातीनं उडी घेऊन आपल्या शुद्ध प्रेमाची साक्ष पटवून देणाऱ्या आम्हा प्रेमवीरांना शरम कां वाटावी ? मी तुझ्यावर प्रेम करतो आहे, आणि त्या प्रेमाखातर मी तुझा मार्ग रोखून इथं उभा राहिलों असतांना तूं मला नांव ठेवतेस ? कमाल आहे तुम्हां तरुणींची. कोकिले, अग कोकिले. (केविलवाणं तोंड करून तिच्याकडे पाहतो)

**कोकिला** :—बाई बाई बाई, आजकालच्या तुम्हां तरुणांना कांहींच कसं वाटत नाहीं ?

**वसंत** :—काय वाटावं ? काय वाटावं कोकीले आम्हाला ? स्त्रीजातच निर्माण झाली नसती तर तुमच्या सौंदर्यावर भाळून आम्ही तरूण असें बेहोष झालो नसतो ! कोकिले, कोकिले माझा जीव अगदीं वेडा बनला आहे गं ( हात धरायला जातो )

**कोकिला** :— बाई, बाई, बाई, तुम्हा तरुणापुढं शर्थ झाली बाई, किती म्हणून माणसानं निलाजरेपणा करायचा कांहीं तरी त्याला सीमा असते. चला जाऊद्यां मला. ( जाऊ लागते )

**वसंत** :— ( तिच्यापुढं गुढगे टेकून ) देवी, तुझ्या दर्शनाकारितां हपापलेल्या रात्रंदिवस जप करणाऱ्या भक्ताला दर्शन देऊन पावन केलंस, आतां प्रसाद न देतां अशी विन्मुख लोटून चाललीस कुठं देवी ? ठेव तुझा तो प्रेमी हात या भक्ताच्या खांद्यावर ठेव, म्हणजे मग ( हात धरायला जातो ती बाजूला होते. )

**कोकिला** :— बाई, बाई–बाई असं काय हें, शोभतं कां तुम्हांला हें ? भर रस्त्यांत एकाद्या कुमारिके पुढं असे गुढघे टेकून प्रेमयाचना कारायचं ? व्हा दूर जाऊंद्या मला.

**वसंत** :— ( उठून ) कोकिले, कां बरं मला दूर लोटतेस अशी ? मी तुझा दास आहे. माझ्यावर प्रेम कां करीत नाहींस तूं ? अग मी तुझ्या सौंदर्यानं अगदीं वेडा बनलों आहे लाडके.

पद

**ह्या होईगे दास तुझा जगीं ।**
**तन मन ग पायीं या वाही ह्या ॥ धृ ॥**
**नजर पाहुनी तुज बावरी होई ।**
**मग दूर लोटिसी सांग सखे कां ॥ १ ॥**

**कोकिला** :—लाडके, जर कुणी ऐकलं तर काय म्हणेल ? तुम्हाला एक कांहीं नाहीं त्याचं, पण मला नको बाई तोंड दाखवायला जगांत.

**वसंत** :— अग जगाला नको दाखवूंस, पण मला दाखवायला काय हरकत आहे ? अग लोकांनीं पहावं, आपलं गोड बोलणं ऐकावं, तुझं माझं लग्न व्हावं, आपण सुखानं नांदाव अशी माझी मनिषा आहे ! कोकिला कां रागावतेस विनाकारण माझ्यावर ?

**कोकिला** :— बाई–बाई–बाई. तुम्हा तरुणापुढं शर्थ झाली बाई ( मुरका मारते )

**वसंत** :— ( तिला हसविण्याकरीतां बायकी भाषेंत ) बाई–बाई–बाई शर्थ झाली बाई ( कोकिला हासते त्याबरोबर तिचा हात पकडतो ) बोल कोकिले, आतां हांसलीस कीं नाहीं ? जी मुलगी हासली ती प्रेमांत फसलीच म्हणून समजावी. ( हात सोडविण्याचा प्रयत्न करिते ) छे, छे; आतां हात सुटणं शक्य नाहीं. तुझा ज्या वेळीं कबुलीजबाब मिळेल त्यावेळीं हा हात सुटला जाईल.

**कोकिला** :— हात सोडा ना माझा ! वेळ होतो आहे मला. सरलाताई ओरडतील ना ?

**वसंत** :— ओरडूं दे ! त्यांचं ओरडणं माझ्या कानावर आदळेपर्यंत तुझा हात सोडणं शक्य नाहीं !

**कोकिला** :— मी सांगेन हं बाबांना ?

**वसंत** :— मग तर फारच छान ! तूं आपणहून आपल्या वडिलांना माझ्यावर तुझं प्रेम आहे, असं सांगून आपल्या लग्नाची त्यांच्या जवळून संमत्ती घेणार आहेस होय ? वा, फार उत्तम ! होय ना कोकिले ?

**कोकिला** :— बाई–बाई–बाई, पहा बरं ! तुमचा हा गळेपडूपणा मला नाहीं आवडायचा !

**वसंत** :— अग मग तुला आवडतं तरी काय ? ( ती हात सोडविण्याचा प्रयत्न करिते ) छे, असा कुठं हात सुटतो ? आणि तुझा जो मी हात धरिला आहे, तो सोडण्याकरीतां नव्हे बरं !

**कोकिला** :— ( काकुळतेच्या स्वरांत ) किती म्हणून माणसानं असा त्रास द्यायचा ? सोडायचा नाहीं कां माझा हात ?

**वसंत** :— ( अधिकार वाणीनें ) नाहीं म्हणून सांगितलना एकदां, तूं जर प्रेमाची कबुली देणार असशील तर मी हात सोडतो.

**कोकिला** :— बरं, आहे माझं प्रेम आपणावर ! आतां तरी सोडाना माझा हात ?

**वसंत** :— वा ! फारच शहाणी दिसतेस ? हातचं सोडून पळत्याच्या पाठीं लागण्याइतका मी शहाणा नाहीं ना ?

**कोकिला** :— इश्य ! असं काय करायचं गडे ? सोडायचाना माझा हात ?

## पद

**कोकिला :—** हा झडकरी मम कर सोडाना।
**वसंत :—** थांब सखये उगा घाई कां? ॥ धृ० ॥
**कोकिला :—** मनीं नच कांहीं लाज रे सखया।
**वसंत :—** हा कर करांत घे सुखवाया।
**कोकिला :—** विनवित राया सोडा कर हा।
**वसंत :—** थांब सखये उगा घाई कां? ॥ १ ॥

**वसंत :—** वा, हात सोडण्याकरितां असं गाणं म्हणावं लागतं कां? आतां कळलं बरं. आनंद झाला मला. तुला कुठं जायचं म्हणालीस.

**कोकिला :—** सरलाताईच्याकडे.

**वसंत :—** काय? सावकारांच्या सरलेकडे? म्हणजे तूं सावकारशाहींत वास्तव्य करणारी आहेस एकूण पण मी मात्र शेतकरी संघातला आहे! कोकिळे सावकाराकडे जातेस पण सांभाळून हं. सावकाराचं घर म्हणजे विषारी सर्पांचं वारूळ आहे बरं वारूळ.

**कोकिला :—** असूंद्या! पण आमच्या सरलाताई कांहीं तशा नाहींत! बरं येते हं मी.

**वसंत :—** अग पण थांब ना जरा, मघां फार रागावली होतीस नाहीं माझ्या-वर? माफ कर हं मला, तुला त्रास दिल्याबद्दल.

**कोकिला :—** ( लाडीक ) त्यांत काय मोठंसं! अहो तें नुसतं रागाचं सोंग होतं, म्हटलं पहावं आपलं किती प्रेम आहे तें माझ्यावर? खरंच भ्यालांत कीं काय तुम्ही?

**वसंत :—** हो. तुझ्यासारख्या सोंगाच्या रागाला कां भितो आहे मी? बरं तें असूं दे! पण आतां कळलं ना किती प्रेम आहे तें! कसे आहोंत आम्ही आज-कालचे प्रेमवीर?

**कोकिला :—** खरंच ग बाई, आज–कालच्या तुम्हा तरुणांपुढं शर्थ झाली बाई ( मुरका मारून जाते )

**वसंत :—** ( गेली त्या दिशेकडे पहात ) गेली–पळाली–बिजली चमकून नाहींशी झाली. परमेश्वरी लीला अतर्क्य आहे खरी, पण त्याहीपेक्षां आम्हा

प्रेमवीरांची करणी कांहीं अजब आहे !! वाहवारे प्रेमवीर ! बोला प्रेमवीर की जय !! (जातो)

---

## प्रवेश ४ था



(अविनाशचें घर. अविनाश पुस्तक वाचतो आहे. जवळच सुमती आहे.)

**सुमती** :— आज की नाहीं, आमच्या दादासाहेबांचें लक्षच नाहीं कशावर ! सकाळपासून पहाते आहे, वाचन चाललं आहे नुसतं.

**अविनाश** :— सुमती, मला वाचूंही द्यायचं नाहीं कां ! लहान मुलासारखा त्रास काय देते आहेस ? किती म्हणून माणसानं असं वागावं .

**सुमती** :— मी काय दिला तुला त्रास दादा ? भारीच बाई तुझा स्वभाव अलीकडे असा चिरचिऱ्या झाला आहे ! खरंच आहे तें ! माझे शब्द कसे गोड लागणार तुला ? सरला असती म्हणजे—

**अविनाश** :— म्हणजे काय झालं असतं ?

**सुमती** :— कांहीं नाहीं ! कांहीं झालं नसतं, फक्त तिच्या दर्शनानं नयनाची तृप्तता होऊन, मुखावाटे सरस्वती वदली असती ! तिच्या तोंडचे लाडिक बोल ऐकतांना माझ्या दादाची ब्रह्मानंदी टाळी लागली असती ! आणि आतां तरी काय ? वाचायचं नुसतं ढोंग चाललं आहे. पुस्तकांतील प्रत्येक अक्षरागणिक हृदयस्वामिनीची प्रतिमा दिसत असेल ! होय ना ? दादा-दादा-काय वाचतो आहेस रे ? नांव काय त्या पुस्तकाचं ? 'वचनासाठीं' हीं अक्षरें तुला तशीच दिसतात का रे ?

**अविनाश** — मग कशी दिसणार.

**सुमती** :— अरे, व च्या ठिकाणीं स अशा अनुक्रमानें वचना या तीन अक्षरी शब्दाऐवजीं, सरला, हा तीन अक्षरी शब्द आणि साठीं या ठिकाणीं माझी हा शब्द म्हणजे, "वचनासाठीं" या ऐवजीं "सरला माझी" असं दिसणार, खरं ना ?

**अविनाश** :— चल, तुझं आपलं कांहीं तरीच ! इतका कांहीं मी भावना-प्रधान नाहीं, किंवा रोमँटिकही नाहीं.

**सुमती** :— काय–काय म्हटलंस ? तुझं तें इंग्रजी मला येत नाहीं. स्पष्ट मराठींत बोल पाहूं !

**अविनाश** :— छे–छे–सुमती कांहीं शब्द आपल्या मराठी भाषेंत तितके गोड नाहींत आणि असले तरी ते उच्चारतांना पाहिजे तेवढे मजेदार वाटत नाहींत.

**सुमती** :— होय तर, कॉलेजांत जाऊन आलेल्या माणसाच्या अंगावर इंग्रजी भाषेचा कृत्रीम पोषाक चढलेला असल्यामुळें, त्याला आपली मूळची मायभाषा, रानवट आणि कमी प्रतीची वाटूं लागते हें मात्र खरं.

**अविनाश** :— झाला तुझा माय भाषेचा स्वाभिमान जागृत ? मराठीची कट्टी स्वाभिमानी आहेस म्हणायची तूं ! सुमती तुला, मराठीची आचार्य करायला हरकत नाहीं.

**सुमती** :— मला आचार्य ? वा, अरे मी स्त्री आहे, माहीत आहे ना ? कां तें सुद्धां विसरलास सरलेच्या चिंतनांत ? कांहीं म्हण दादा, पण सरला माझी वहिनी झाली तर, मी खात्रीनं सांगते कीं माझा हा दादा संपूर्ण सुखी होईल ! पण दादा, तें आपलं सुख पहायला, आपलं कोडकौतुक करायला आपली आई बाबा असते तर किती चांगलं झालं असतं ? भविष्य कालच्या सुखद विचारांच्या काल्पनिक सौख्यांत विहारतांना आईवडिलांची आठवण होऊन मला राहून राहून किती वाईट वाटत आहे म्हणून सांगूं ?

**अविनाश** :— चालायचंच. काय करायचं त्याला ? भूतकालच्या दुःखद-स्मृती आठवून मनाला बाईट वाटून घेण्यांत काय अर्थ आहे ? भूतकाल कसा गेला याचा पडताळा ताडून पहातां येईल. वर्तमान कसा जातो आहे याचं समक्ष निरिक्षण करतां येईल. पण भविष्य काळ कसा जाईल हें सांगतां येईल कां ? मग नुसत्या भविष्याविषयीं मनोरम्य कल्पना करून त्यांत तरंगण्यांत काय बरं उपयोग ? आज आपण सुखी आहोंत असं मानायचं. मनाचं समाधान करायचं ! या गत कालच्या साऱ्या आठवणी काढून मनाला कां उगाच वाईट वाटून घेतेस ? सुमती, तुला अशी दुःखी पाहिली कीं माझा सारा उत्साह नाहींसा होतो. सुमा, तूं सुखी नाहींस का ?

**सुमती** :— ( आनंदी चेहरा दाखवून ) संकटाशीं सिंहाप्रमाणें झुंजणारा तूं माझा भाऊ पाठीशीं असल्यावर मी कां बरं सुखी असणार नाहीं ? माझं कोडकौतुक पुरवायला माझा दादा मला पुरे आहे बरं !

**अविनाश** :— मग हे असले वेडे विचार मनांत आणून मनाला कां बरं वाईट वाटून घेतेस ? असले विचार कधींही करूं नयेत माणसानं !

**सुमती** :— पण विचार करायचे नाहींत असं म्हटल्यानं कां कुठं विचारांची गती थांबत असते ? मनाच्या अथांग मैदानांत, विचारांचा वारू एकदा बेसुमार सुटला कीं तो केव्हांही थांबत नाहीं. त्याची गती हजारों योजनाहून अधिक आहे. कुठल्या भीषण प्रसंगाच्या भविष्यकालीन स्थानावर ती स्थीरावेल हें कांहींच सांगतां येणार नाहीं. बाबांनीं, माझ्या रक्षणाची जबाबदारी तुझ्या शिरावर टाकली असल्यामुळें तुला किती बरं त्रास होत असेल, हाच पदोपदीं विचार, माझ्या मनांत येतो. दादा—दादा—खरंच माझ्यापासून तुला त्रास होत असेल नाहीं ?

**अविनाश** :— किती वेडी आहेस तूं सुमती ? मी तुझ्याकडून कांहीं तरी लपवून ठेवलं आहे कां कधीं ? मग कां मला असं विचारतेस ? माझ्या आवडत्या बहिणीच्या सुखाकरितां मीं कांहीं जरी केलं तरी त्यामुळं मला त्रास न होतां उलट सौख्यच मिळेल. सुमा तुझं लक्ष कांहीं आज ठिकाणावर नाहीं. कांहीं तरी बडबडते आहेस झालं. अरे पण हा महादू कशाला येतो आहे इकडे ?

**महादू** :— ( प्रवेश करून ) अविनाश साहेब, तुमास्नी आबासायबानी बोलावलं हाय ! अक्षी बिगी बिगी बोलावलय, लई मोठा काम हाय असं मास्नी सांगितलाय.

**अविनाश** :—मला बोलावलं आहे? माझ्याजवळ काम ?

**सुमती** :— महादू, इतक्या तातडीनं बोलाविले आहे कारे ?

**महादू** :— व्हय तर, मास्नी म्हणाले की त्यास्नी बरोबर आन.

**अविनाश** :— बरं मी येतों—चल—तूं हो पुढं ( महादू जातो. ) अविनाश कपडे वगैरे घालतो. ते घालीत असतां. )

**सुमती** :— दादा—कसलं रे एवढं जरुरीचं काम आहे.

**अविनाश** :— कुणाला ठाऊक-किती दिवसांनी मी आबाकडे जातों आहे! ( जायला निघतो ) बरं मीं जातों हं.

**सुमती** :— अधिक वेळ बसूं नको हं, लवकर ये म्हटलं.

**अविनाश** :—अधिक वेळ कसा बसेन? एक वेडी आहे ना घरांत, वेळींच आलों नाहीं तर लहर येईल ना तिला वेडाची ( हासत हासत जातो )

**सुमती** :— ( थोड्या वेळानं ) किती बरं माझ्या सुखाची दक्षता घेतो आहे माझा दादा. मी सुखी असावं, सदा आनंदी राहावं म्हणून आपल्या साऱ्या दुःखी भावना गिळून नेहमीं आपल्या कार्यांत मग्न असतो!! त्यामुळें मला कसलीच कदर वाटत नाहीं. दुनयेंत एकट्या दादाच्या आसऱ्यावर मी मोठ्या आनंदानं राहूं शकेन!! परमेश्वरा आम्हीं गरीब आहोंत, तरीसुद्धां जगांत सुखासमाधानानं, आनंदानं राहूं! या घरांत सुद्धां पराच्या गाद्या गिरद्यांची सुखाशीनता आम्हाला चाखतां येईल! श्रीमंतीपेक्षां समाधानाची ही गरीबी अनंतपटीनं श्रेष्ठ आहे.

पद

**सुखवी श्रम-जिवी जिवांना ॥**
**हृदयीं शांती पसरवितसे ॥ धृ० ॥**
**धनिका ऐसा कठोर बाणा ॥**
**कधींही वसत नच सौख्य दे सदा ॥ १ ॥**

**वसंत** :— ( प्रवेश करून ) अविनाश आहे कां? सुमती अविनाश कुटं गेला.

**सुमती** :— कोण वसंता, कायरे, काय काम आहे?

**वसंत** :— रामजी बाबांनीं बोलावलं आहे त्याला. सकाळीं आबासाहेबाकडे गेले होते ते पैसे द्यायला. त्यावेळीं त्यांचें आणि आबासाहेबांचें कडाक्याचें भांडण झालें. त्यांचे पुरे पैसे दिले असतांना आबासाहेबांनी त्यांच्यावर कर्ज काढलें त्या बद्दलच कांहीं सांगायचं आहे अविनाशला!

**सुमती** :— दादा तर आतांच आबासाहेबांकडे गेला आहे! महादू आला होता बोलवायला, कांहीं महत्त्वाचं काम आहे, म्हणून आबासाहेबांनी बोलावलं आहे त्याला!

**वसंत** :— काय आबासाहेबांकडे गेला आहे अशिनाश ? मग त्या संबंधींच कांही तरी सांगण्यासाठीं त्याला बोलाविलं असणार खास. बरं मग जातों मी ! तो आल्याबरोबर पाठवून दे त्याला. जातों हं ( जातो. सुमतीही जाते )

( पडदा पडतो )

---

## प्रवेश ५ वा



( आबासाहेबांचा दिवाण खाना. आबासाहेब व सुधीर )

**आबा०** :— माणसाला आपल्या आयुष्यांत सुखानं राहायचं असेल तर त्याला सत्य आणि नीति यांना झुगारून देऊन बेछूटपणानचं जगांत वागलं पाहिजे ! पाप पुण्याच्या काल्पनिक प्रसंगान, भेदरून जाऊन माणूस जर धर्माधर्माच्या वृत्ती हृदयाशीं बाळगील, तर त्याला बुभुक्षितासारखंच राहावं लागेल ! सत्य आणि श्रीमंती, व्यवहार आणि माणुसकी, अधिकार आणि सच्छीलता याचं जगांत नेहमीं व्यस्तच प्रमाण असतं !! नीती अनितीच्या बागुलबुवाला भिऊन, मी जर आजपर्यंत वागत आलों असतों तर या आबासाहेबाला; या घमेंडखोर शेतकऱ्यांनीं केव्हांच पळता भुई थोडी करून टाकली असती भित्यापाठी ब्रह्मराक्षस हेंच खरं ! ( सुधीर प्रवेश करतो ) सुधीर ती प्रॉमिसरी लिहून झालीं कां ? आणा पाहूं इकडे.

**सुधीर** :— हो झाली ही पहा ( सुधीर प्रॉमिसरी काढून देतो )

**आबा०** :— ( वाचून ) बस्स, योग्य, उत्तम. सारं कसं अगदीं ठाकठीक झालं आहे !! आतां अविनाश यायची खोटी कीं झालीच नाटकाला सुरवात.

**सुधीर** :— पण आबा, नाटकाचा शेवट गोड झाला पाहिजे ना ?

**आबा०** :— कां होणार नाहीं ? इतकं कारस्थान बेमालूम झाल्यानंतर शेवट हा आनंदपर्यवसायी होणार, अहो हा कारस्थानाचा भुईकोट पाडण्याकरिता आमच्या सारख्या सावकारी डोक्याचाच माणूस पाहिजे, अविनाशसारख्या पांचदहा पावसाळें पाहिलेल्या पोराला तें केव्हांही शक्य नाहीं. सुधीर, तुम्ही फार मागें अहात जगाच्या ! तुम्हाला हें कळायचं नाहीं. हें कारकुनी डोक्याचं

काम नाहीं. इथं सावकारी डोकंच पाहिजे!! आता अविनाश केव्हां येईल? अरे तो पहा अविनाश आलाच! (अविनाश प्रवेश करितो) (अविनाश उभा राहिलेला पाहून)

**आबा०** :— अविनाश आलास, तुझीच वाट पहात होतों मी!

**अविनाश** :— कां, आबा, मला इतक्या तातडीनं कां बोलावलंत? काय काम आहे?

**आबा०** :— काम, अरे अतिशय महत्त्वाचं आणि तुझ्या हिताचं आहे!

**अविनाश** :— हिताचं, माझ्या हिताचं काम? कसलं बुवा?

**आबा०** :— खालीं बस असा, बावरूं नकोस! (अविनाश जवळच्या खुर्चीवर बसतो)

**अविनाश** :— इतका जिव्हाळ्याचा प्रश्न आहे?

**आबा०** :— होय फारच जिव्हाळ्याचा प्रश्न आहे (सुधीरला) सुधीर, ती प्रॉमिसरी इकडे आणा पाहूं! (प्रॉमिसरी हातांत घेऊन) हें पहा अविनाश, तूं कांहीं मला इतरासारखा नाहींस म्हणून मी बोलावून आणिला. तुझ्या वडिलांनीं माझ्याकडून पांचशें रुपये काढले आहेत! आज त्याला तीन वर्षें होत आलीं. तुझे वडील वारलें त्यामुळें आतां याची व्यवस्था तुलाच केली पाहिजे, तेव्हां म्हटलं या पैशांचं तूं काय करणार?

**अविनाश** :— काय बाबांनीं पांचशें रुपये कर्ज काढलं होतं?

**आबा०** :— घाबरूं नकोस असा; मी कांहीं आजच तुझ्यावर कायद्याची अंमलबजावणी करीत नाहीं. म्हटलं तुला माहीत असलेलं बरं. एकदम देऊं नकोस पैसे, थोडे-थोडे दिलेस तरी मी घेईन!

**अविनाश** :— पण आबासाहेब मी ते तरी कुठून देणार? इतकं माझ्यावर कर्ज आहे, हें मला माहित सुद्धां नव्हतं!

**आबा०** :— कसं माहित असणार? तुझ्या वडिलांच्या व्यवहाराची तुला कांहीं तरी माहिती होती कां? पण हें तरी तुला मरते समयीं वडिलांनीं सांगायला पाहिजे होतं? कांहींच सांगितलें नाहीं ना?

**अविनाश** :— छे एक अक्षर सुद्धां बोलले नाहींत.

**सुधीर** :— हो पण शेवटच्या समयीं त्याबरोबर बोलणंही बंद झालं होतं ना ? मग कसे सांगणार ? बरं त्यांनीं सांगितलं नसलं, तरी ही प्रॉमिसरी आहे ना ? म्हणजे प्रश्नच मिटला.

**अविनाश** :—होय तुमच्या म्हणण्याप्रमाणें प्रश्न मिटला म्हणायचा खरा ! पण तुमचं म्हणणं तरी काय ?

**आबा०** :—म्हणणं काय असणार ? तूं कांहीं तजविज करावी एवढंच.

**अविनाश** :— ( श्वास सोडून ) तजवीज ? कशानं करूं तजवीज ?

**आबा०** :— ( आंत हांक मारल्यासारखें करून ) थांब हं अविनाश, मला कुणीतरी हांक मारली वाटतं ( आंत जातो ) ( अविनाश विचार करीत स्वस्थ बसतो )

**सुधीर** :— अविनाश, विचार कसला करतोस ? कांहीं नको विचार करायला.

**अविनाश** :— असं कसं म्हणून चालेल सुधीर ? आधीच परिस्थितीनं मी गांजलों आहे आणि त्यांत हा वर कर्जाचा बोजा ! कां बरं विचार करावा लागणार नाहीं ?

**सुधीर** :— हो, त्याचा मी विचारच केला नाहीं. त्यांत तुझी बहिणही उपवर झाली असेल नाहीं ?

**अविनाश** :— कांहीं विचारूं नका. त्या विचारानं तर अगदीं कांहीं सुचेनासें होतं !

**सुधीर** :— लग्न करायला पाहिजे नाहीं तिचं यंदां ?

**अविनाश** :— लग्न ! सुधीर लग्न कांहीं तोंडचं आहे ? कशानं लग्न करायचं ? आज पोट भरण्याची जिथं पंचाईत तिथं लग्न कशानं करायचं ? एक लग्नांत हजार विघ्नांचा समावेश झालेला असतो ! !

**सुधीर** :— तेंही खरं आहे ! ( विचार करून ) याला एक मार्ग आहे. हो ? पण तुला तो पसंत पडला पाहिजे ना, मला वाटतं त्या मार्गानं तूं गेलास तर सारं कांहीं सुरळीत होईल ! !

**अविनाश** :— अस्सं ? इतका चांगला मार्ग आहे ! सांगा तर खरा, पाहूं पसंत पडतो कां ?

**सुधीर** :—खरोखरच इतका उत्तम मार्ग आहे कीं त्यामुळें तुझ्या बहिणीचें भाग्य उदयालाच आलं म्हणून समज ! तिचं आयुष्य सुखांत जाईल. तिच्या हाताखालीं कित्येक माणसं नोकर या नात्यानं राबतील, पहा बुवा इतकं उत्तम स्थळ आहे ! आहे विचार तुझा ?

**अविनाश** :— अशा ठिकाणीं द्यायची नाहीं तर कुठं द्यायची ? पण मुलगा कसा आहे ?

**सुधीर** :— मुलाबद्दल तर कांहीं विचारायलाच नको ! तुझ्या ते चांगले परिचयाचे आहेत.

**अविनाश** : असं असेल तर मग कांहीं हरकत नाहीं ! पण मुलाचं नांव तरी सांगाल कीं नाहीं.

**सुधीर** :— अजून नाहीं तुझ्या लक्षांत आलं ! अरे आपले आबासाहेब. कसे अगदीं योग्य आहेत नाहीं !

**अविनाश** :—( एकदम उठून ) कोण आबासाहेब ?

**आबा०** :— ( आंतून एकदम येऊन ) उठूं नकोस अविनाश ! मी कांहीं तिचे हाल करणार नाहीं. तिला गुलाबाच्या फुलाप्रमाणें सांभाळीन; माझ्या जिवापेक्षांही तिच्या प्रकृतीला जपेन !

**सुधीर** :— अविनाश तुझी बहीण सुखांत पडेल ! तिला कसलीही वाण पडणार नाहीं. आणि तुझेही दिवस आनंदांत जातील !

**अविनाश** :— सुधीर, शरम नाहीं वाटत तुम्हाला असं बोलायला ? म्हणे दिवस मजेत जातील ! तोंडाचं बोळकं झालेल्या या म्हाताऱ्याला, शरिराला सुरकुत्या पडून स्मशानांत गेलेल्या हाडांच्या चालत्या बोलत्या सांपळ्यांला माझी आवडती बहीण–कोवळ्या सुमनाची सुमती देऊन तिच्या जन्माची राख रांगोळी करूं ? सुकुमार वेलीला धडधडत्या आगींत होरपळून काढूं ? हे शब्द उच्चारतांना तुमच्या मनाला कांहीं तरी वाटायला पाहिजे होतं !

**सुधीर** :— अविनाश, सांभाळून बोल ! विचार कर, यांत कुठं वाईट आहे ? होत आहे तें तिच्या कल्याणाचंच होतं आहे !!

**अविनाश** :— कल्याण ! सुधीर कल्याण कशांत आहे, हें तुम्ही नको आहे मला शिकवायला. आबासाहेबासारख्या साठी उलटून गेलेल्या म्हाताऱ्याच्या

गळ्यांत सुमतीसारखी अल्लड, निराधारी बालिका टाकून, वैधव्याच्या खोल गर्तेंत लोटण्याचं पाप मी आजच करून ठेवूं काय? पैशांपायीं लोकांच्या माना मुरगाळून निरपराधी शेतकऱ्यांच्या रक्तानं रंगून श्रीमंत बनलेल्या जिवंत राक्षसाच्या पदरीं निव्वळ कसाईखान्यांत, माझी एकुलती एक बहीण मी देऊं काय?

**सुधीर** :— तोंड आटोप, अविनाश बकवा बंद कर! एकदां निक्षून सांगतों कीं तुला या जगांत जगायचं असेल, अब्रूनें राह्यचं असेल, तर आबासाहेबांच्या म्हणण्याला रुकार दे!

**अविनाश** :— हें कालत्रयीं होणार नाहीं. (जाऊं लागतो)

**आबा०** :— अविनाश चाललास कुठं? हे पैसे केव्हां देणार? लवकर पैसे मिळाले नाहीं तर मला दुसरा मार्ग अवलंबावा लागेल!

**सुधीर** :— आबा, शांत व्हा! शांत व्हा!! अविनाश भावनेच्या भरांत भडकला आहे, तुम्ही सुद्धां तापून कसं चालेल? आपण थोडं मोठं पोट करा! मी म्हणतो कीं अविनाशनें बहीण द्यायचं कबूल केलं तर त्याला पैसे सोडण्याची, दया करण्याचं काम तुमचं आहे!

**आबा०** —हो! हो, मोठ्या आनंदानं करूं शकेन दया!

**अविनाश** :— दया! निर्दय कसाया! दया हा पवित्र शब्द उच्चारून त्याची पवित्रता भस्मसात करूं नको! अरेरे, आम्हां गरीब मानवांचा; दीन, शेतकऱ्यांचा कुणीच कां त्राता नाहीं. काय करूं रे! सच्छल कुमारिकांकडे पापी दृष्टीनं पहाणारे यांचे हे डोळे, लाल भडक तापलेल्या सळईनें फोडावेसे वाटतात–! पापानं धुंद झालेल्या सैताना लक्ष्यांत ठेव, असल्या पापाचं प्रायश्चित्त परमेश्वर तुला दिल्याखेरीज कधींही रहाणार नाहीं.

**पद**

**वचना वदे या हृदयांत ठेवा।**
**दलितासी गांजोनी करि पाप ठेवा ॥ धृ ॥**
**हा नाश सारा पुरता कुलाचा।**
**अपुल्या करीं हा धनमाज साचा ॥ १ ॥**

**सरला** :— (एकदम प्रवेश करते) आबा, कसली आरडा–ओरड चालली आहे ही? अविनाश काय झालं असं रागवायला?

**अविनाश** :— मी कुणावर रागवणार ? अत्याचार करणाऱ्या या नरराक्षसांना पापाची जाणीव कंठशोषानं सांगत आहे मी ! सरले, सत्य हें कधींही पापापुढं मान तुकवीत नसतं !

**सरला** :— म्हणजे अविनाश.

**आबा०** :—कारटे एक शब्दही बोलूं नकोस त्याच्याजवळ? सर्पाच्या मुलाला दूध पाजलं तरी ते गरळ ओकल्याशिवाय कसं राहील ? सरले चालती हो घरांत !

**सुधीर** :— अविनाश, इथून एकदम चालता हो कसा ! नाहींतर गड्या-कडून तुला हाकलून द्यावं लागेल ? वायफळपणा एकदम बंद कर !

**अविनाश** :— सुधीर पापाचे घडे केव्हां तरी भरतातच ! परमेश्वर सत्याचा वाली आहे ! ! पापाचा–परमेश्वर बनलेल्या क्रूरा, तुझ्या सैतानी लालसेचं तुला लौकरच प्रायश्चीत भोगावं लागेल !

**सरला** :— ( अविनाश जाऊं लागतो त्याला हाक मारून ) अविनाश,

**अविनाश** :— सरले, आता मला इथं एक क्षणभर सुद्धां थांबायचं नाहीं ..

**सरला** :— थांबा—

**आबा०** :— कशाला थांबा–अविनाश गुण्यागोविंदानं गेलास तर ठीक... कारटे चल घरांत...( तिला धरून आंत लोटूं पहातो ती त्याला झिडकारून )

**सरला** :— आबा, पैशानं धुंद झालेल्या तुम्हा श्रीमंतांच्या डोळ्यांत झण-झणीत अंजन घालण्याकरितां, आणि तुमच्या कृतीनं भुकेकंगाल बनलेल्या गरिबांकरितां ! तुमची मुलगी तुम्हां सावकारांना नामशेष करून गरिबांना सुखी करणाऱ्या संघांत जातीनं वाहून घेण्याचा मार्ग पतकरीत आहे. ही पहा... ( अविनाशचा हात धरून जाऊं लागते. )

**आबा०** :—सुधीर. ती कारटी पहा चालली कुठं ? खेचा तिला, पहातां काय ? ( सुधीर तिला खेंचावयाला जातो. अविनाश आड येऊन त्याला हाताचा जोरानें हिसका देतो त्या बरोबर तो झोकंड्या खातो. आबासाहेब दिङ्मूढ होऊन पाहातात. अविनाश व सरला जातात. पडदा पडतो )

---

# अंक २ रा



## प्रवेश १ ला



[ समय संध्याकाळ. अविनाशाचें घराबाहेरील आवार. सुमती बाहेरील सृष्टी शोभा पाहण्यांत तल्लीन झाली आहे. ]

पद ( भावगीत )

**मंद मंद हा निर्झर वाहुनी गान गोड गातसे ।**
**वसुधादेवी समिर वाहवुनी साथ तया देतसे ॥ धृ ॥**
**प्रभाकराच्या श्रमपरिहारा पश्चिमही नटली ।**
**पाहुनि नाथा लाली कपोला तिच्या पहा चढली ।**
**मधुमिलनाचा रम्य योग हा नयनी देखोनी ।**
**वसुंधरेचे प्रफुल्ल मुख हे झाले हरुषानी ॥ १ ॥**

**सुमती**:— ( एकदम भानावर येऊन ) दादा कां बरं अजून येत नाहीं ? आज तर त्यांच्या शेतकरी संघाची सभा आहे ! आणि एवढा वेळ झाला तरी दादाचा अजून पत्ता नाहीं ! कां कुणास कळें, एक क्षणभर जरी दादाला यायला वेळ झाला तरी माझा जीव कसा अगदी घाबरल्यासारखा होतो. कां बरं आला नाहीं दादा ?

**सरला**:— ( प्रवेश करते ) ओहो ! कितीपण भावाची काळजी आहे बहिणीला. सुमती तुझ्यासारखी मायाळू बहीण अविनाशना असल्यावर—

**सुमती**:— आणि तुझ्यासारखी जन्माची सोबतीण लाभल्यावर त्याला कां बरं आनंद होणार नाहीं !

**सरला**:— ( उसन्या रागानें ) चल वेडी कुठली ! मला नाहीं बाई हें असलं खपयाचं ! सांगेन हं मी अविनाशना.

**सुमती**:— काय सांगणार आहेस त्याला ? वा, बरीच ग आहेस तूं, आतां. पासूनच कां लागलीस मालकीणपणा गाजवायला. काय सांगणार आहेस दादाला ? ( हासते )

**सरला** :— बघ हं सुमती हे ग काय असं, नाहीं तर जाते मी.( जाऊ लागते )

**सुमती** :— अग जायला नको कांहीं असं रागावून ! आता येईल बरं दादा ! मी बोललें त्याचा राग आला कां ग तुला ? खरंच आहे तें; तूं पडलीस श्रीमंत नी आमचा दादा पडला गरीब. तुला राग येणं शक्य आहे ! चुकी झाली माझी. क्षमा कर हं मला !

**सरला** :— चल, क्षमा मागते आहे माझी ! आले कां तुझ्या डोक्यांत गरीबी श्रीमंतीचे विचार ? क्षणभर थट्टा केली ती सुद्धां नाहीं तुझ्या लक्षांत आली ? माझी मतं फार निराळीं बनलीं आहेत, बरं सुमती, आज होणाऱ्या सभेंत शेतकऱ्यांच्या जीवनाची वास्तवस्थिती लोकांना समजावून देणार आहे मी,

**सुमती** :— म्हणजे तूं व्याख्यान देणार आहेस आज ?

**सरला** :— होय ! कां ? तुला आश्चर्य वाटलं.

**सुमती** :— आश्चर्य नाहीं कांहीं. पण आबासाहेब नाहीं कां रागावणार ? आणि शिवाय सावकाराविरुद्ध असणाऱ्या शेतकरी संघाची ही सभा आहे, म्हणून मी म्हणते.

**सरला** :— आतां काय करायचं मला वडीलांशी ? त्यांचं समाधान म्हणजे साऱ्या शेतकऱ्याचं समाधान नव्हे.

वैयक्तिक समाधानाकरितां, असंख्य जीवांच्या हीन दशेकडे डोळेझांक करून; त्यांना दारिद्र्याच्या पंकांतून वर न काढतां, त्यांत गाडण्याचें कसाब कृत्य करूं ? नाहीं. दलित समाजाला लाथाडून, त्याच्या करुण स्थितीकडे ! नुसता दृष्टिक्षेप सुद्धां न करितां त्याला दुःखाच्या प्रज्वलीत आगींत टाकण्याचं, समाजद्रोही कृत्य माझ्या हातून कालंत्रयी होणार नाहीं ! !

सुमती ही सरला कालच सावकारशाहीची शत्रू बनली आहे. सावकारांनीं डंवचलेली ही आतां एक जहरी नागीण बनली आहे ! या दिव्याकरितां मी आत्मयज्ञही करायला तयार आहे !

पद

**देई स्वसुखाचा बली हा निश्चयें ।**
**धरि नयनी ध्येय सुयश पथा लागीं ॥ धृ० ॥**
**रुधिराची ही सारी नातीं;**
**तोडूनि टाकी या हस्तांनीं ।**
**तळमळ लागे विश्व-सुखाची ॥ १ ॥**

**अविनाश** :— (प्र.) शाबास ! सरले शाबास !! धन्य आहे तुझी ! हृदयापासून निघालेले तुझे हे बोल ऐकल्याबारोबर मला वाटलं कीं मी स्वप्नांत तर नाहीं ना ? अहाहा काय तुझें हे धाडस ? दलित वर्गाकरितां तूं आपल्या आत स्वकियांच्या प्रेमाचा बळी देणार, कोण ही तुझी बहुमोल समाजसेवा !! आतां मात्र तुझ्या हृदयावर दलितांच्या दीन दशेचं दृश्य खरंखुरं उमटलं म्हणायचं ! चल आतां आपण सभेला जाऊं... (पडद्यांत–शेतकऱ्यांचा विजय असो अशा अरोळ्या) ऐक हा शेतकऱ्यांच्या घोषणेचा नाद ऐक ! या उत्साही निनादाबरोबर लाखों सावकारांच्या हृदयांत–हृदय कसलं त्यांच, पाषाणच तें. त्या पाषाणावर, या विजरुपी घणाचे सारखे वज्राघात होऊन ते आतां दुंभंगून जाईल कीं काय अशी त्यांना भीति वाटूं लागली असेल ! चल, सरले शेतकरी एकत्र जमून आपली वाट पहात असतील !! सुमती आम्ही लवकर येतो बरं.

**सुमती** :— लवकर या हं !

**सरला** :— सभा आटोपल्याबरोबर निघून येऊं. दुसरं कुठंही जाणार नाहीं. (जातात)

**सुमती** :— किती सुंदर दिसतो आहे हा जोडा, ईश्वरा यांचीं हृदये अशींच एकमेकांशीं जखडून ठेव ! यांच्या संसाराचा बाग, निर्मल प्रेमरुपी झऱ्याच्या पाण्यानं शिंपला जाऊन सदोदीत टवटवीत राहूं दे ! एकक्षणभरसुद्धां यांना दुःख लाभूं देऊं नको. (आजूबाजूला कांहीं तरी वाजतें. संध्याकाळ झाली असल्यामुळें अंधाराची अंधुकशी छाया पसलेली असते. सुधीर निराळ्या वेषांत प्रवेश करतो) कोण, कोण तें, असं लपत छपत कोण येत आहे ?

**सुधीर** :— मी आहें.

**सुमती** :— कोण तूं ? नांव काय तुझं ? आणि इथं असं लपत छपत येण्याचं काय कारण ?

**सुधीर** :— कारण दुसरं कोणतं असणार ? कारण तूं !

**सुमती** :— पण तुझं नांव सांग आधी मला ?

**सुधीर** :— माझं नांव, माझं नांव सुधीर ?

**सुमती** :— कोण ? सुधीर ? तुम्ही अशा वेळीं नि या वेषांत ? कशाला आलांत अहांत माझ्याकडे ?

**सुधीर** :— मागणी करायला ?

**सुमती** :— कसली मागणी ?

**सुधीर** :— कसली म्हणून काय विचारतेस ? अग तुझ्यासारखं रत्न समार असतांना दुसरी मागणी करणं म्हणजे मूर्खपणाचं होईल ? सुमती तुझ्यासमोर लक्ष्मी लोटांगण घालीत आली आहे, तिला लाथेनं झुगारून देऊं नकोस ?

**सुमती** :—म्हणजे मी नाहीं समजलें तुम्ही काय म्हणतां तें ?

**सुधीर** :— अग, आबासाहेबांकरितां तुला मागणी घालायला मी आलों आहें. बोल तुझी संमति आहे कीं नाहीं.

**सुमती** :— काय बोलतां सुधीर – शोभतं का तुम्हांला हें ?

**सुधीर** :— न शोभायला काय झालं ? त्यांत तुझं कुठं वाईट होणार आहे. त्या म्हाताऱ्याच्या पश्चात् आहे तें सारं तुझंच आहे ?

**सुमती** :— सुधीर, मी कांहीं पैशाला भुकेलेली नाहीं. देहविक्रय करून पैसा कमाविण्यापेक्षां वीष पिऊन मेलेलें काय वाईट ? सुधीर विचार करा !

**सुधीर** :— असलं तत्त्वज्ञान् तूं मला शिकवूं नकोस

**सुमती** :— नाहीं मी आपल्याला तत्वज्ञान शिकवीत नाहीं. पण तुम्हाला एवढंच विचारतें, कीं, माझ्यासारख्या, परक्याच्या मुलीच्या आयुष्याचं कल्याण करण्या ऐवजीं, तुम्ही आपली बहीण आबासाहेबांना देऊन तिचं कल्याण करा ?

**सुधीर** :— लाज नाहीं वाटत असं बोलायला तुला ?

**सुमती** :— लाज मला वाटावी कीं पैशाच्या राक्षसी लालसेला लुब्ध होऊन गरिबांच्या मुली, जख्खड म्हाताऱ्याच्या हवालीं करणाऱ्या तुम्हा नराक्षसांना वाटावी ? सुधीर तुमच्या डोक्यांत शिरलेले हे वेडे विचार काढून टाका !

**सुधीर** :— तें कांहीं नाहीं. तूं तयार आहेस कीं नाहीं लग्न लावायला.

**सुमती** :— नाहीं – नाहीं – त्रिवार सांगतें मी कबूल नाहीं म्हणून !

**सुधीर** :— नाहीं तयार लग्न लावायला ? ( उपदेशाच्या स्वरांत ) सुमती, पहा मग पश्चात्तापांत पडशील ! आबासाहेबांच्या म्हणण्याला जर तूं तयार झाली नाहींस, तर तुमचं घरदार सारं कांहीं जाईल ! तुमच्यावर कर्ज किती आहे, माहीत आहे तुला ? तें फेडण्याकरितां, तुम्हां दोघां बहीणभावंडांना आबा-

साहेबांकडे मोलमजुरी करावी लागेल आणि मग कोणीसुद्धां विचारणार नाहीं तुम्हाला ? सुमती – सुमती – विचार कर, आतांपर्यंत तूं जें स्वतंत्रतेनं आयुष्य घालविलें आहेस, तें तुला यापुढें पारतंत्र्यांत लाथाबुक्याच्या ठोकरीनं काढावं लागेल ?

**सुमती** :— अहाहा ? काय पण माझी कळकळ वाटते यांना ! खरंच माझ्या-बद्दल तुम्हाला कळवळा वाटतो ?

**सुधीर** :— वाटतो म्हणून काय विचारतेस ? अग, तूं जें सांगशील तें ऐकायला मी एका पायावर उभा आहें ?

**सुमती** :— तर मी सांगतें तें ऐकाल का ?

**सुधीर** :— हो ! हो ! तुझ्या म्हणण्याप्रमाणं वागायला मी तयार आहें. बोल काय आज्ञा आहे ?

**सुमती** :— विशेष कांहीं सांगत नाहीं ! आलेत, तसें चालते व्हा पाहूं ?

**सुधीर** :— चालता होण्यासाठीं आलों नाहीं मी. तूं असले लपंडाव खेळायला लागलीस काय ? बोल तुझी तयारी आहे कीं नाहीं ?

**सुमती** :— सुधीर, तुम्ही आलेत तसें चालते व्हा पाहूं इथून. आया बहिणी नाहींत तुम्हांला ? आपल्या स्वतःच्या बहिणीला, पैशाच्या आशेनं देऊं शकाल कां एका म्हाताऱ्याला ?

**सुधीर** :— बस्स् ! तुझी चर्पटपंजरी नको आहे मला ? ( पुढें होतो ) बोल कबूल आहेस कीं नाहीं तूं लग्न लावायला. ( हात धरतो )

**सुमती** :— सुधीर, इथपर्यंत मजल आली आपली ! ( झटकाऱ्यासरसी हात सोडवून घेते ) अजूनपर्यंत पाहिले नव्हते तुझ्यासारखे नरराक्षस ? ही पहा मी चाललें दादाला बोलवायला. ( जाऊं लागते, इकडून सुधीर व दुसरीकडून दोन बुरखे घेतलेले सेवक पुढें येतात. ) कोण तुम्ही ? कां आड आलांत ? जाऊं द्या मला. या पाप्याचे डांगोरे पिटूं द्या मला साऱ्या दुनियेंत ? वाट सोडा माझी !

**सुधीर** :— पकडा तिला, पहातां काय ? ( सेवक पकडतात. सुधीर जाऊन हात धरतो )

**सुमती** :— ( हात सोडण्याचा प्रयत्न करिते ) सोड – सोड – मेल्या मला ! सोडवा कुणी तरी या गरीब गाईला या वाघाच्या पंजांतून ( सुधीर रुमालाचा बोळा तिच्या तोंडांत घालतो. ती बेशुद्ध होते. )

**सुधीर** :— चला उचला हिला. पाहातों आतां हिची कोण सुटका करायला येतो तें ? तुम्ही व्हा पुढं. ( सुमतीला उचलून सेवक नेतात ) या कारकुनी पट्ट्यानं एक कारस्थान तर बेमालूम पार पाडलंय ! आतां अविनाशचा सूड ! माझा अपमान केला नाहीं त्यानं ? पण हा डंवचलेला सर्प आहे. हा सर्प एका जन्मीचा सूड सात जन्मपर्यंत विसरत नसतो ! सगळीकडे दारुगोळा तर सज्ज करून ठेवलाच आहे. आतां वात लावायचीच खोटी, कीं झालंच सारं भस्मसात ! ! ( खिशांतून दागिना काढतो ) हा दागिना अविनाशच्या झोपडींत ठेवून द्यायचा, आणि उद्यां चोरीच्या आरोपावरून त्याला कैद करायचा ! म्हणजे मग जिरेल कीं नाहीं सारी ! जणूं त्याला वाटतं कीं मी म्हणजे कोण ? अरे पण म्हणावं हा सुधीर कारकून आहे. कारकुनी काव्याचा ब्रह्मदेवाच्या बापाला सुद्धां मागमूस लागणार नाहीं, तर या यःकश्चित्, तारुण्याचं रक्त सळसळत असणाऱ्या या घमेंड-खोराला काय लागणार ? शक्य नाहीं. हें कारकुनी डोकं आहे, सर्पाच्या दंशानं भिनणारं वीष फार बरं, पण कारकुनाच्या कानावरील ह्या दोन जिभांच्या काळ-तोंड्या नागिणीच्या चाव्यानं चढणारं वीष फार भयंकर असतं, अशा त्या नागिणीचा पिता मी हा सुधीर कारकून ! म्हणजे मग माझा फुत्कार किती विषारी असेल ? एका फुत्काराबरोबर भस्मसात् केलं नाहीं तर नांवाचा सुधीर कारकून नव्हे. ( झोपडींत जातो, ) पडदा पडतो.

---

## प्रवेश २ रा



रस्ता. आनंद दारूच्या निशेंत येतो.

**आनंद** :— आनंद, माझ्या आयुष्यांत सारा आनंद भरून राहिला आहे ! या आनंदाला आनंदाखेरीज जगांत कांहींच दिसत नाहीं. भूतलावर वास्तव्य करणाऱ्या मानवांनो ! माझ्यासारखे तुम्ही आनंदी व्हा ! पण तो आनंद कसा प्राप्त करून घ्यायचा माहीत आहे का तुम्हाला ? माहीत नसेल तर या दिलदार, दिलावर—आनंदाच्या स्वर्गीय सीमेचें सिमोल्लंघन करणाऱ्या या आनंदाला विचारा ! ! ( खिशांतून दारूची बाटली काढून ) हा पहा—हा पहा स्वर्गीय

आनंदाच्या सौख्यमंदिराचा सोपान, हाच तो मार्ग–हाच तो सुलभ रस्ता. ही मदिरा दुःखाच्या दुर्दम्य वातावरणांतून माणसाला सौख्याच्या सुगंधीमय हवेंत एका क्षणांत वावरायला लावते. या संजिवनीच्या एका घोटाबरोबर आपल्या आयुष्यांतील साऱ्या दुःखद विचारांना मूठमाती मिळून आपण संपूर्ण सुखी होतों. म्हणून म्हणतों तुम्ही सुद्धां माझ्यासारखे आनंदी व्हा आणि सारं जग आनंदी करा. ( तोंडाला बाटली लावतो ) अहाहा ! देवी मदालसे ! काय तुझी ही अजब करणी ? तुझा हा एक घोट पोटांत गेल्याबरोबर सारं जग कसं मला आनंदी, सौंदर्यवान दिसूं लागलं ! हें पहा जिकडे तिकडे सौंदर्य कसं दिसूं लागतें. ( पुन्हां पितो ) हा पहा या दुसऱ्या घोटाबरोबर मी कुठं तरी उंच उंच असा जाऊं लागलों ! ( थांबून ) आतां कुठं आलों मी ? स्वर्गांत, स्वर्गांत–आलों मी ! या स्वर्लोकचा मी आतां इंद्र आहें–आणि माझी अप्सरा ? ती पहा या इंद्राची आवडती अप्सरा इकडेच येते आहे. ( कोकिला येते. तिच्याकडे सारखी टक लावून पहात असतो. झोकांड्या सारख्या जात असतात. )

**कोकिला** :— बाई–बाई–बाई–आज कालच्या तरुणांपुढं शर्थ झाली बाई ! काय मेला निलाजरेपणा हा ! कसा टक लावून पहातो आहे माझ्याकडे. आहे का कांहीं त्याला ? स्वारी अगदीं ताराबाईच्या रंगांत दंग झाली आहे. श्रीमंतांचीं मुलं किनाहीं हीं ! यांना कोण बोलेल ? गरीबांना नाडायचं, त्यांचे तळतळाट घ्यायचे. त्यांच्याकडून वाटेल तसे पैसे उकळावयाचे, पण त्या पैशाचा विनियोग पहा कसा होतो आहे तो.

**आनंद** :— राणीसाहेब रागावलेल्या दिसतात. हायरे मेरा बुलबुल ! राणी कोकिला ! कां रागावलीस माझ्यावर ? ( तिच्याजवळ जाऊं लागतो )

**कोकिला** :— हा तर माझ्या जवळच येऊं लागला. आतां काय करूं बाई !

**आनंद** :— ए अस्मानकी परी. कोकिले अशी इकडे ये ! अग हा आनंद म्हणजे आनंद आहे ! हा आनंद तुझा आनंद आहे–या गांवाचा आनंद आहे.

**कोकिला** :— चला दूर व्हा ! जाऊंद्या मला ! काय चालविलं आहे तुम्हीं या भर रस्त्यांत ?

**आनंद** :— काय चालविलं आहे ? दुसरं काय चालविणार ? प्रणयचेष्टा ! कुठलाही तरुण आणि कुठलीही तरुणी, एके ठिकाणीं आली कीं त्यांच्या एकमेकांमध्यें प्रणयचेष्टा या व्हायच्याच !

**कोकिला** :— पुरे झाल्या या माकड – चेष्टा !

**आनंद** :— काय माकडचेष्टा, मी माकड ? मी माकड नाहीं, माणूस आहे ! मला माकड म्हणतेस ? हा माझा – आनंदाचा – या सावकार पुत्राचा अपमान आहे ! कोकिले, तें कांहीं नाहीं, तूं माझी राणी झाली पाहिजेस ?

**कोकिला** :— राणी. कुणाची – तुझी, तुझ्यासारख्या दारुड्याची ?

**आनंद** :— मला दारुड्या म्हणतेस ? दारुड्या म्हणजे तुला कोण वाटला ? अग दारु म्हणजे काय आहे, माहित आहे का तुला ?

**कोकिला** :— मला माहीत नाहीं ! चालूं लागा बघूं तुम्ही मुकाट्यानं !

**आनंद** :— मुकाट्यानं चालूं लागूं ? कां ? मी दारू घेतों म्हणून ! बरोबर आहे, स्त्रिया मत्सरी असतात. हेंच खरं. तुला माझा कां राग आला हें कळलं मला. स्त्री जात सवतीमत्सरानं प्रेरीत झाली कीं ती तुझ्यासारखीच वागणार ! या दारूच्या सान्निध्यांत मी वाहूं लागलों कीं तुझ्याकडं माझा सहाजिकच कानाडोळा होणार आणि तसं झालं की तुला माझ्या नांवानं सारखे खडे फोडावे लागणार म्हणून तूं या दारूचा – तुझ्या सवतीचा नायनाट करण्यासाठीं हा रागाचा आविर्भाव आणला आहेस ! नाहीं कां ? पण मी मोठा धूर्त आहे ! बायकांच्या या असल्या काव्यानं फसणारा मी दुधखुळा नव्हे ! मी दारुही सांभाळणार आणि तुलाही जवळ करणार, समजलं ! ( तिला जवळ ओढण्यासाठीं जातो )

**कोकिला** :— चला बाजूला व्हा. असा लघळपणा करूं नका माझ्याजवळ !

**आनंद** :— बाजूला होऊं ? लघळपणा करूं नको मग काय करूं ? काय केलं म्हणजे तूं मला तुझ्याजवळ घेशील ? अग मी कोण आहे माहीत आहे ना तुला ? मी सावकार पुत्र आहे ! माझं तुम्हीं सर्वांनीं ऐकलंच पाहिजे ? कसं झालं तरी मी सावकार आहे !!

**कोकिला** :— आग लावा तुमच्या सावकारीला ! म्हणे मी सावकार आहे !! चला व्हा बाजूला ! जाऊं द्या मला !!

**आनंद** :— जातेस ? कुठं जातेस मला टाकून, जातेस – कशी जातेस, तेंच मी पहातों !! ( हात धरायला जातो )

**कोकिला** :— मेल्या शरम नाहीं वाटत तुला ? चालता हो. ( त्याच्या तोंडांत मारते. तो दारूनं अगदीं धुंद झाला असल्यामुळें पडतो – व रडत रडत उठतो )

**आनंद** :— माझ्या तोंडांत मारलीस ? मी सावकार पुत्र असून तूं माझ्या तोंडांत मारलीस ? पाहून घेईन तूं काय समजतेस ? मी सावकार पुत्र आहे ( जातो )

**कोकिला** :— चांभाराच्या देवाला ही अशी खेटराचीच पूजा पाहिजे त्याशिवाय नाहीं हे ताळ्यावर यायचे ! ! असल्या या माणुसकींतून उठलेल्या नरपिशाच्च्याकडे पाहिलं कीं असं वाटतं—

**वसंत** :— ( प्रवेश करून ) कसं वाटतं ?

**कोकिला** :— कोण आपण, आपण आलांत कां ? सांगूं कसं वाटतं तें ?

**वसंत** :— तसं कांहीं सांगूं नकोस ? कारण तसं कांहीं सांगण्यापूर्वीच तुझा हा चंडिकेचा रुद्रावतार चौदाव्या रत्नाची पुरेपूर साक्ष देतो आहे ! बाकी हा तुझा आतांचा पराक्रम पाहाण्यापूर्वी मला वाटत होतं कीं सुंदर तरुणी आपल्या गालांवर सांडलेल्या गुलाबी शराबेनं तरुणांना बेभान करतात ! पण आतां मात्र हेंही कळून चुकलं कीं त्याच तरुणी मदिरादेवीच्या प्राशनानं धुंद झालेल्या तरुणांना चांगल्या ताळ्यावरही आणूं शकतात ! !

**कोकिला** :— आणतात म्हणजे खोटं कीं काय ? स्त्रीजात जितकी सौम्य दिसते, तितकी ती सौम्य नाहीं बरं ? जोंपर्यंत आपल्या शीलावर पाळी आली नाहीं तोंपर्यंत त्या वाटेल त्या संकटांना निमूटपणें तोंड देतील ! पण जर का त्यांच्या शीलाची विटंबना होण्याची पाळी आली तर त्या एखाद्या चवताळलेल्या वाघिणीप्रमाणें पावित्र्याची विटंबना करणाऱ्या नराधमाच्या नरडीचा घोंट घेतल्याशिवाय कधींही राहणार नाहीं, समजलं !

**वसंत** :— हो समजलं, चांगलं समजलं मला ! फार लौकर जागं केलंस मला तूं. चंडिके, देवी, कालिके ! साष्टांग प्रणिपात असो तुला. ( पाया पडतो )

**कोकिला** :— कां हो ! आपल्यालाही वेडाची लहर आली वाटतं ? वेड घालविण्याचं मजजवळ फार चांगलं औषध आहे बरं ! वाह्यात बडबड करणारं तुमचं हें तोंड मी एका क्षणांत बंद करून टाकीन.

**वसंत** :— बरोबर आहे ! जगांतल्या कुठल्याही तरुणाचं तोंड बंद करण्याचं सामर्थ्य तरुणीशिवाय कुणांत असेल बरं ? तोंडांतून शब्द काढण्यासाठीं ओंठ हे

हलवावेच लागतात, पण ते ओंठच जर आपल्या गोड अधरानें तरुणीनं बंदिवान केले तर त्याचं तें वाह्यात बडबड करणारें हें तोंड बंद झाल्याशिवाय कसं राहील ?

**कोकिला** :— सांगू का तुम्हांला ? तुमचं हें असं विनाकारण बडबडणारं तोंड बंद करण्यासाठी मला एक अशी...( तोंडांत मारायला जाते. )

**वसंत** :— अग एकच का ? अशा दहा तोंडांत जरी मारल्यास, तरी मला त्यांत आनंदच होईल. कारण माहित आहे तुला ? माझं हें वेड्यासारखं बडबडणं बंद करण्याच्या सद्धेतूनं, आपुलकीनं तूं जो हात माझ्या तोंडांत मारशील तोच तुझा हात त्याच आपुलकीनं, सद्धेतूनं, मला तुझ्याबद्दलचं लागलेलं वेड नाहींसं होऊन मी सुखी व्हावं, याकरितां माझ्या हातांत हात द्यायला तूं मागें पुढं पहणार नाहींस ! आणि एकदां तो हात या हातांत दिलास कीं तो जन्माचा साथीदार झालाच म्हणून समज. ( हात धरतो )

**कोकिला** :— बाई – बाई – बाई तुम्ही तरुण असे कांहीं निर्लज्ज असतां, कीं कांहीं लाज लज्जा नसतेच तुम्हाला ? खरंच ग बाई तुम्हां तरुणांपुढं शर्थ झाली बाई ! ! ( झटक्यासरशीं हात सोडविते. )

**वसंत** :— अग शर्थ आणि शर्यत यांत कांहींही फरक नाहीं. कारण तरुण आणि तरुणी यांच्या मध्यें, परस्परांच्या मनाचा टाव घेण्याची एकमेकांची शर्यत लागलेली असते. तरुणाला वाटत असतें कीं " खरंच का तिचं माझ्यावर प्रेम असेल ?" तर तरुणीला वाटत असतं कीं, " खरंच कां ते माझ्यावर प्रेम करीत असतील ? " एकूण काय ? तरुण तरुणीकडे, आणि तरुणी तरुणाकडे आशाळभूतपणानं पहात असतात. पण त्यांच्यामध्यें एक भिंत उभी असते. ती भिंत कुणालाहि ओलांडून जातां येत नाहीं आणि मग आपल्या भावना मारून टाकून प्रत्येक तरुण आणि तरुणी आपलं जीवन कंठीत असतात ! अशी ती शुष्क जीवन बनविणारी भिंत माहीत आहे का तुला कोकिले ?

**कोकिले** :— मला काय माहीत ? मीं कधीं कुणावर प्रेम केलं आहे का ?

**वसंत** :— कुणावर केलं नसशील पण माझ्यावर तर करते आहेस ना प्रेम ! ! आणि असं असतांना तें पडद्याआड दडवून ठेवते आहेस ! अग हीच ती भिंत ! भुकेनं व्याकूळ झालेल्या माणसानं नुसत्या आशाळभूतपणानं मेवा-

मिठाईकडे पाहून काय उपयोग? अग प्रेम करायलासुद्धां सामर्थ्य लागतें; दुबळ्या माणसाला प्रेमच करतां येणार नाहीं! माझ्यासारखा मर्द असेल तरच तो प्रेम करील, म्हणून मी जगांतल्या साऱ्या तरुणांना ओरडून सांगतों कीं, तरुणांनो! माझ्यासारखे तुम्ही मर्द बना! "आधीं कुणी बोलावं" ही भीति काढून टाका. तुम्हांला वाटत असेल कीं, ही तरुणी आपल्यावर प्रेम करते आहे. तिला माझ्यासारखं राजरोसपणें विचारा, माझं तुझ्यावर प्रेम आहे, तुझं माझ्यावर आहे कां?

**कोकिला**:— आणि तिनं पायांतील प्रतिनिधीला हात घातला तर!

**वसंत**:— तर काय? त्या प्रतिनिधीचा अव्हे न करतां, कोमल, लुसलुसीत मृदुमांसल हातांत विराजणाऱ्या पायांतील प्रति धीचा प्रसाद सेवन करायचं सामर्थ्य दाखवा! त्या तरुणीच्या हातांतील चंपलच. मार सोसण्याच्या सामर्थ्यानं त्या तरुणीचे डोळे दिपून जाऊन तुम्हाला ती तरुणी .ळली नाहीं तर हा सत प्रीतिशास्त्रविशारद या पदवीला लायकच नाहीं असं समज।'

**कोकिला**:— अहाहा! काय पण अकलेचे तारे तुटले. काय तर म्हणे तरुणीच्या पायांतील चपलांचा मार खा! कांहीं वाटतं का सांगायला?

**वसंत**:— अग त्यांत काय खोटं सांगतों कीं काय? कुठलीही स्त्री पुरुष्यांच्या सौंदर्यावर भाळून, त्याच्याशीं लग्न करायला तयार होत नाहीं! सामर्थ्य हें पुरुषाचं सौंदर्य आहे आणि सौंदर्य हें तुझ्यासारख्या स्त्रीचें सामर्थ्य आहे, असं मोठमोठ्या साहित्यकांचं म्हणणं आहे! आणि तें खरंही आहे! समजलं? म्हणून म्हणतों, तरुणांनो, माझ्यासारखे तुम्ही प्रेमवीर बना! प्रीतीच्या राजकारणांत मान आणि अपमान यांना जागा नाहीं. तरुणीनं केलेल्या अपमानानं खालीं पडलेला प्रेमवीर मार सहन करण्याच्या सामर्थ्यानं उद्यां त्याच तरुणीच्या हृदयसिंहासनावर आरुढ झाल्याशिवाय राहाणार नाहीं. बोला प्रेमवीर की जय!!

**कोकिला**:— बाई – बाई – बाई – तुम्हां तरुणापुढं शर्थ झाली बाई. किती बाई हा अश्लील विनोद तरी?

**वसंत**:— अग आजच्या या विसाव्या शतकांत असल्याच या अश्लील अनिर्बंध विनोदावर आपलं पोट भरणारे किती तरी आचार्य दिसून येतील तुला.



**आनंद** .— मी सावकार पुत्र असून तूं माझ्या तोंडांत मारलीस ? पाहून घेईन...... [ पृ. ४४ ]

**कोकिला:**— बरं, तें असूं द्या, पुरे झालं तुमचं व्याख्यान येतां कीं नाहीं?

**वसंत:**— येतों तर, अग तुझ्या हुकुमाबाहेर आहे का मी कधीं? कसा असणार बरं! कारण तूं माझी राणी आणि मी तुझा राजा!

पद

**वसंत:**— प्रित भरारी मारूं ग रानीं।
मी तूं राजा राणी ग सखये।
प्रीतच ध्यानीं मनीं॥ ग सखये॥

**कोकिला:**— चल जाऊं प्रिती कुंजांत।

**वसंत:**— प्रितीच्या अंगणांत।

**कोकिला:**— नभीं उंच उंच उडूं, स्वैरपणानं।
चंडोल पक्षावाणीच सखया॥ १॥

**वसंत:**— तूं चित्तचकोरी प्यारी।

**कोकिला:**— सुनि दुनिया तुजविण सारी।

**वसंत:**— लागला तुझा हा बाण जिव्हारी।
या जिवासी सुखवी झणी ग सखये॥ २॥

(हात धरून जातात)

---

## प्रवेश ३ रा



अविनाशचें घर. अविनाश विचारमग्न. दोन शेतकरी व रामजी.

**अविनाश:**— काय म्हणावं या गोष्टीला? चमत्कार कीं भुताटकी? कालपासून शोधून दमलों, तितक्या वेळांत सारी दुनिया पालथी घालतां आली असती. कालचा तो वाढता उत्साह या प्रकारानं पार मावळून नाहींसा झाला! पृथ्वीच्या पाठीवर बंधुभगिनी या नात्यानं निगडित झालेले दोन जीव एकमेकांच्या विरहानें दुःखसागरांत बुडाले जाणार नाहींत का? बाबांनो! आपला शेतकरी समाज साऱ्या बाजूनें वेढला आहे. प्रत्येक शेतकऱ्याला आपलं स्वतःचं संरक्षण करणं हें सुद्धां अगदीं नामुष्कीचं झालं आहे!

**रामजी** :— मग काय करावं ? अविनाश तुम्हीच असे हातपाय गाळूं लागलांत तर आम्ही कुणाच्या तोंडाकडे बघायचं ? आमच्या सगळ्यांच्या उड्या तुमच्या जिवावर आहेत; तुम्ही धीर सोडलांत ! तर मग आम्ही काय करावं ? उठा नी आपल्या कामाला चला, असं बसून कसं चालेल ?

**अविनाश** :— रामजीबाबा रक्तमांसाचे संबंध फार निराळे आहेत ! बंधू-भगिनी प्रेम हें पृथ्वीवर वास्तव्य करणाऱ्या कुठल्याही प्रेमापेक्षां कांहीं अजब आहे. जात जातीकडे ओढली जात नसली तरी रक्त रक्ताकडे खेंचलेलं जात असतं ! ! या झालेल्या प्रकारांनीं मी अगदीं हतबुद्ध झालों आहे ! ( श्वास सोडतो. )

**पद**

**अंतरींची तळमळ सारी ।**
**भगिनीविना ना शांत होत ही ॥ ध्रु ॥**
**बंध तुटतां रुधीर प्रवा ।**
**वाट सुगम मग होत तयाला ॥ ॥**

**सरला** :— ( प्रवेश क. ) अहारे तरुण पुरुष, काय हा तुमचा मर्दानी बाणा ? यःकश्चित प्रसंगाला भिऊन, आपल्या मूळ ध्येयापासून पराङ्मुख होणाऱ्या तरुणा ! समाजाच्या हिताकडं पहा ! एका व्यक्तीच्या सुखाकरितां साऱ्या शेतकरी समाजाची आहुति देणाऱ्या वीरा ! पहा, नीट दलित समाजाकडे पहा ! सावकारांच्या दडपशाहीनं तडफडणाऱ्या शेतकऱ्यांच्या होत असलेल्या करुणजन्य किंकाळ्या, आकाश पाताळीं दणाणत आहेत ! त्या कानावर येत नाहींत का ? अविनाश स्वस्थ काय बसलांत ? स्वस्थता नाहींशी करा नी मीं विचारलेल्या माझ्या प्रश्नाला उत्तर द्या !

**अविनाश** :— सरले, काय उत्तर देऊं ? उत्तर देण्याची माझी मनःस्थिती नाहीं ! माझ्या हृदयाला सर्व बाजूंनीं इंगळ्या लागल्या आहेत. त्याच्या वेदना तुला कशा कळणार ? मी अगदी किंकर्तव्यमूढ बनलों आहे.

**सरला** :— हें कोण बोलत आहे ? शेतकऱ्यांचे पुढारी म्हणून मानले जाणारे अविनाशच का बोलत आहेत ? अविनाश आपलेच का हे शब्द ! तुमच्या हृदयाला तेवढ्या इंगळ्या लागल्या आहेत, त्याच्या वेदना फक्त तुम्हाला येत आहेत, पण शेतकऱ्यांना सावकाररूपी राक्षस चरचरा कापतो

आहे ! त्यांना वाटेल तसा नाडतो आहे, त्यांना नाहीं कां वेदना होत ? काय हें बोलतां ? शेतकऱ्यांच्या लाल ध्वजाखालीं उभे राहून ! या चंद्रमौळी घरांत राहाणाऱ्या चालत्या बोलत्या ईश्वराची सेवा करण्याकरितां कुणाही आप्तस्वकियांच्या प्रेमाचा बळी देण्याची अथवा स्वदेहाच्या यज्ञाची पाळी आली तरीसुद्धां मी मागें पुढें पहाणार नाहीं—अशा मोठ्या आवाजांत मारे ओरडून सांगणारे आपणच कां वाक्पंडित ? अविनाश बोलणं तेवढं सोपं असतं पण करणं फार कठीण असतं बरं ! !

**अविनाश** :— काय बोलूं मी, मला कांहींच कळत नाहीं !

**सरला** :— या प्रसंगानं तुमचा मेंदू मंद झाला ? तुमच्याकडे पाहून हसावं कीं तुमची कींव करावी हेंच कळत नाहीं मला ? अविनाश विचार करा. तुमच्यासारखा सुशिक्षित नेताच जर असा गलितधैर्य झाला तर साऱ्या शेतकरी समाजाचे हातपाय मोडले जाऊन लंगडा नाहीं का पडणार ? आणि तो लंगडा झाला म्हणजे सावकारशाही त्याची पायपोसाइतकीही किंमत ठेवणार नाही ! [illegible] कुत्र्याच्या मोलानं मरावं लागेल.

**अविनाश** :— ( विचार करून ) सरले तुझं म्हणणं बरोबर आहे ! भगिनी-प्रेमाच्या भोळ्या भावनेनं माझ्या डोळ्यावर आलेली भूर तूं दूर केलीस ! माझ्या हृदयामधून या असंख्य शेतकरी बांधवांबद्दलचं सुप्त झालेलं प्रेम तूं जागृत केलंस ! भावनेच्या भरांत, मी माझ्या कर्तव्यापासून च्यूत होत होतों पण, सरले, तूं मला ताळ्यावर आणलंस ! ! भगिनी सुखाकरितां लाखो जिवांची मार्गदर्शक म्हणून शिरावर घेतलेली जबाबदारी झिडकारीत होतों पण तूं मार्गावर आणलंस ! मला मार्ग दाखविणारी तूं देवता आहेस. मी भावनावश होऊन जें कांहीं बोललों असेन त्याबद्दल मला क्षमा कर.

**सरला** :— इश्य् , हें काय असं वेड्यासारखं ? मी तुम्हाला कठोर बोलले, याबद्दलच क्षमा मागायला पाहिजे मी ! पण कशी चुकली एवढी स्वारी ?

**अविनाश** :— मनुष्य प्राणी हा चुकायचाच ! कितीही हृदयाचा कठोर असला तरी, हे संबंधच असे आहेत कीं त्याचे धागे तोडतांना हृदय रक्तबंबाळ व्हायचचं ! !

**सरला** :— खरं आहे तें ! परंतु जिथं सारं घरच पेटायला आलं आहे तिथं द्रव्याची आशा धरून, त्या द्रव्याकरितां धडपडायचं ानि घर पेटू द्यायचं आणि,

अखेर जिवाचाही स्वाहा करायचा हें चांगलं का ? त्यानं काय होईल ? त्यापेक्षां घर विजाविण्याचा भगीरथ प्रयत्न केला तर त्याला यश येऊन सारं कांहीं सुरळीत होईल ! घरा परी घर राहील आणि द्रव्याची लागलेली तळमळही शांत होईल.

पद

**सुयश ही लाभे करितांची यत्नाला ॥ ध्रु ॥**
**कां होय हतवीर्य तव वीर सम हा ।**
**मग कोण दावी ध्येय जनाला ॥ १ ॥**

**अविनाश :—** अहाहा ! सरले, तुझे शब्द ज ़ू मला अमृताप्रमाणें भासतात ! त्या शब्दागणिक माझ्या हृदयांतून नाहींशी झालेली चित्शक्ती – पूर्वीपेक्षांहि अधिक तीव्रतेनं चेतना पावली गेली ! सरले चल, शेतकरी ़बांनो उठा, चला आपण उद्योगाला लागूं. प्रयत्न करून आपल्या जिवाचं रान करू आणि ध्येयाचं उद्यान गांठूं !! ( सगळे उठून जाऊं लागतात, तोंच समोरून पोलीस इन्स्पेक्टर व आबासाहेब येतात )

**पोलीस —** खबरदार, एकदम उभे राहा !

**अविनाश :—** कां ? आम्हाला प्रतिबंध करण्याचं कारण ?

**आबा० :—** तुझ्यावर चोरीचा वहीम आहे.

**अविनाश :—** वहीम, आणि चोरीचा ? मीं चोरी केली ?

**आबा० :—** पुरे झाला हा ढोंगी कांगावा !

**सरला :—** आबा हा काय प्रकार आहे ? कसली चोरी नी कुणी केली.

**आबा :—** खबरदार कारटे, तूं तर माझ्या कुळाला अगदीं काळिमा फांसलास ? तुलाही जायचं आहे का याच्या बरोबर कैदेंत ?

**अविनाश :** वेड लागलं नाहीं ना तुम्हांला ?

**आबा :—** वेड मला लागलं नाहीं, पण तूं मात्र वेड्याचा आव आणला आहेस खरा ! अरे अशी चोरी करून कां कुठं पचत असते.

**अविनाश :—** मीं चोरी केली ?

**आबा :—** पुन्हां तेच शब्द, पोलीस याच्या भोंवती गराडा घाला. इन्स्पेक्टर-साहेब याच्या घराची झडती घ्या ! पण स्वखुशीनें अगोदर कबूल होतो का पहा !

**इन्स्पेक्टर :—** अविनाश, खरं सांग, नाहींतर हें प्रकरण तुला फार त्रासदायक होईल. तूं आणला आहेस का एखादा दागिना चोरून, नव्हे फसगतीनं खिशांत घालून ! हे म्हणत होते कीं, त्या दिवशीं तुझ्याशिवाय घरीं दुसरं कोणीही आलं नाहीं, आणि तुझे आणि आबासाहेबांचे तितकेच घरोब्याचे संबंध असल्यामुळें मी म्हणतों कीं फसगतीनं खिशांत घालून आणला आहेस का ?

**अविनाश :—** फसगतीनं खिशांत घालायला मी कांहीं दुधखुळा नाहीं. माझ्याकडे यांचा एकही दागिना नाहीं ! सावकाराकडील एक पै सुद्धां घ्यायला माझा हात ओढला जात नाहीं तिथं मी दागिना चोरून आणिन ? नाहीं, शक्य नाहीं हें.

**आबा० :—** कुभांड अं ! अजूनही तुझी मग्रूरी आहेच म्हणायची. इन्स्पेक्टर-साहेब, झडतीलाच सुरवात करा ! ( इन्स्पेक्टर पोलीस आंत जातात. )

**सरला :—** आबा कां विनाकारण त्यांना छळतां ? काय त्यांनीं तुमचं असं केलं आहे ?

**आबा० :—** कारटे, इथून एकदम चालती हो कशी. या शिकलेल्या कारट्या अशा बदफैली होतात. म्हणे काय केलं यांनीं ? दिसेल आतां तुला ! ( झडतींत इन्स्पेक्टरला दागिना मिळतो )

**इन्स्पेक्टर :—** आबासाहेब, हाच का तुमचा दागिना ?

**आबा० :—**( दागिना हातांत घेऊन ) होय, हाच तो दागिना. अविनाश, दागिना कसा आला ? सज्जन ना तूं ? ( अविनाश आश्चर्यचकित होतो )

**इन्स्पेक्टर :—** अविनाश, अरे हे असले लपंडाव चालत नसतात. वरून गोजिरी दिसणारीं हीं सज्जन माणसं अंतरीं किती भयंकर असतात याचं हें चांगलंच उदाहरण आहे. पकडा त्याला – ( पोलीस पकडायला जातात त्याच्या आड येऊन. )

**सरला :—** त्यांना पकडण्यापूर्वी मला पकडा. मी सुद्धां यांची साथीदारीण आहे. त्या बेड्या प्रथम माझ्या हातांत घाला नी नंतर त्यांना...

**आबा० :—** ( ओरडून ) कारटे बापाची तरी कांहीं मर्यादा आहे कां ?

**अविनाश** : ( अविनाशाच्या हातांत पोलीस बेड्या घालतात ) अरेरे मी चोर! मला हा चोरीचा काळा डाग लागला म्हणायचा ! काय करावं ?

**आबा०** :— कांहीं करायला नको, अजून तरी माझ्या म्हणण्याला रुकार दे ! एका क्षणांत तुझी सुटका करतों !

**सरला** :— आबा तुम्हांला बाप म्हणायला सुद्धां मला लाज वाटते ! शरम नाहीं वाटत, आपल्या पापी वासनेसाठीं असलीं नीच कृत्यें करायला ?

**आबा०** :— देईन एक लगावून अशी ( सरलेच्या तोंडांत मारतो. त्या बरोबर अविनाश त्यांच्या आंगावर धांवून येऊन लाथ मारतो )

**अविनाश** :— सैताना तुझे दिवस भरलेच म्हणून समज ! !

**आबा०** :— ( लाथे सरशी पडतो ) मेलो मेलो (पोलिस अविनाशला खेंचतात)

पडदा पडतो

---

## प्रवेश ४ था



( रस्ता—आनंद रेसचें पुस्तक पहात प्रवेश करतो )

**आनंद** :—बस् ! या आनंदाच्या आयुष्याची उद्यां खरी कसोटी आहे म्हणायची ! आजपर्यंत हा आनंद कधींच कुणाला हार गेला नाहीं आणि जाणारही नाहीं; परंतु या रेसच्या घोड्यापुढें मला मात्र मान तुकवावी लागते आहे खरी ! रेस, जुगार, जुगारी जगा, असा बावरून जाऊं नकोस; एखाद्या बहाद्दर घोड्याच्या बहाद्दरीनें, एखाद्या हिकमतपाशाच्या हिकमतीनें अथवा अजिंक्याच्या अजिंक्यतेनं आपण अजिंक्य होऊं का ? अशीं प्रश्नचिन्हं कशाला उभी करतोस ? हा आनंद आनंदाच्या उत्तुंग शिखरावर आरूढ होण्याचा आटोकाट प्रयत्न करून तुला चीत केल्याशिवाय राहाणार नाहीं याची पुरेपूर खात्री असूं दे ! साऱ्या रात्रभर जागून मी उद्यांच्या रेसचे नंबर अगदीं अचूक काढणार यांत शंका नाहीं. माझी मनोदेवता मला ग्वाही देते आहे कीं मी उद्यां जिंकणारच ! माझं नशीब माझ्यावर खैरात करणारच ! ! आनंदाच्या उत्तुंग शिखरावर मी पहुडणारच ! बस्स, पैसाच पैसा ! उद्यां एकदां घोडा आल्यावर

काय कमी आहे ? साऱ्या जगाला पैशाच्या राशींत पुरून टाकीन. माझ्या बुद्धि-वैभवानें मंदिरांत देवाच्या योग्यतेनें आरूढ होईन. मग – चंद्रावती माझी चंद्रावती मला कशी बरं पारखी होईल ? चंद्रा, तुझ्या शीतल प्रेमासाठीं आतुर झालेला आनंद ! जगाच्या तापानें पोळून जाणारा – तुझ्या प्रेमासाठीं आसावलेला आनंद, उद्यां घोड्याच्या गतीनं तुझ्याकडे येईल आणि कायमची जन्माची सोबतीण करून त्या घोड्यावरच जगाच्या अथांग मैदानांत आपली मिरवणूक काढील. भिऊं नकोस, हा आलोंच तुझ्याकडे ! हा आनंद असा तसा नाहीं – नांवाचा आनंद आहे. जगा तुझ्या या दुःखपुरींत आनंदानें बेहोप आनंदाची खरी थोरवी तुला पटवून दिल्याशिवाय राहाणार नाहीं याची खात्री असू दे ! ( जातो )

( पडदा पडतो )

---

## प्रवेश ५ वा

[ आबासाहेबांच्या वाड्यांतील गुप्त खोलींत सुमती विचारमग्न ]

**सुमती :—** परमेश्वरा, पण परमेश्वर कुठं आहे ! जगांत परमेश्वर आहे का ? नाहीं – नाहीं, मला वाटतं जगांत परमेश्वर नाहीं ! सत्याचा वाली – दीनांचा त्राता तो जर असता तर माझ्यासारख्या बालिकेचे हे असे हाल कां झाले असते ? नाहीं, जगांत परमेश्वर नाहीं हेंच खरें ! कुणाला हाक मारूं ? कोण आहे माझं इथं ?

**पद**

**वाली नच उरला मज जगता ।**
**हांक कुणा मी मारूं आतां ॥ धृ ॥**
**विश्वासा ना ठेवी ईशावरी ।**
**अबलांचा तूं कैवारी ।**
**कां मग छळही असूनी त्राता ॥ १ ॥**

( थांबून ) दादा, दादा काय करीत असेल ? माझी वाट पाहून थकला असेल माझा दादा ! किती दुःख झालें असेल त्याला. दादा, दादा, केव्हां भेटशील मला तूं ? ( हुंदके देते. दारावर थाप पडते ) कोण आहे ? काय काम आहे.

**सुधीर** :—( आंतून ) दरवाजा उघड. मी आहें !

**सुमती** :—( भांबावलेल्या परिस्थितींत आवाज न ओळखल्यामुळें ) कोण दादा ? आलास का माझ्या देवा ? ये – ये – लौकर माझ्या पाठिराख्या – बंधुराया ! ( दार उघडते सुधीर – प्रवेश करतो – त्याला पहातांच ) कोण सुधीर, कशाला आलास सैताना ?

**सुधीर** :— चूप, सैतान कुणाला म्हणतेस ? सुमती, गुण्यागोविंदानं आतां तरी हो लग्न लावायला तयार ! कशाला हें यौवन फुकट दवडतेस ? अग ही चालून आलेली संधी कशाला लाथेनें लोटतेस. सार्थक करून घेशील आपल्या जन्माचं.

**सुमती** :— कुणाच्या जन्माचं सार्थक, माझ्या कीं तुझ्या ?

**सुधीर** :— तुझ्या जन्माचं सार्थक ! सुमती, वेडी का आहेस तूं ? तुझ्या ह्या यौवनभराकडे पाहिलं कीं, माझ्या अंगावर गोड रोमांच उभे राहातात, हृदयांत कालवाकालव सुरू होते, आणि हें तुझं तारुण्य फुकट जाणार – ही गुलाबाची कळी, तिचा अस्वाद घेतल्याविना कोमेजणार, ही कल्पना डोक्यांत आली कीं तुझ्याबद्दल मला दया वाटूं लागते आणि हृदयांत प्रेमाचा प्रादुर्भाव उत्पन्न होतो, सुमती – सुमती तुला प्रेमानं सांगतों कीं तूं लग्न लावायला तयार हो !

**सुमती** :— शरम नाहीं कशी वाटत तुला राक्षसा ? माझ्यावर दया कर नि इथून एकदम चालता हो कसा ! थांबूं नको एक क्षणभर सुद्धां !

**सुधीर** :— न थांबण्याची दया करूं तुझ्यावर ? वेडी ग वेडी, वेडे पोरी ही सुंदर सुकुमार तनुलता अशी सुकून कां घालविणार तूं ? नको नको, अग आबासाहेबांवरच काय आहे ? सौख्य मी तुला देऊं शकेन, म्हाताऱ्याचं नांव फक्त ! सुमती नको घालवूं असली सुवर्ण संधी ! माझा जीव अगदीं हळहळतो आहे तुझ्याकरितां, काय सांगूं तुला ?

**सुमती** :— चांडाळा दूर हो. तुझ्या सावलीनंसुद्धां माझा देह विटाळेल !

**सुधीर** :— मी चांडाळ ? माझी सावली अपवित्र ? ( हांसून ) सीतेलासुद्धां कांहीं क्षण पापी रावणाच्या छायेखालीं विसंबावं लागलं ना ? आहारे ! पवित्र्याची पुतळीच कीं नाहीं तूं ! म्हणे माझी सावली अपवित्र ! सुमती, बऱ्या बोलानं माझ्या म्हणण्याला तयार हो कशी.

**सुमती** :— हें कालत्रयीं होणार नाहीं. चालता हो म्हणून सांगतें ना तुला ? चालता हो नाहींतर तुझ्या पायांशीं डोकें आपटून जीव देईन.

**सुधीर** :— जीव देण्याची जरूरी काय ? मी सांगतों त्याप्रमाणें माझ्या म्हणण्याला कबूल हो, म्हणजे तूं माझ्या पायांशीं जीव देण्याऐवजीं, मीच तुझ्या पायाचा बंदा सेवक होईन ! सुमती, लाडके सुमती !

**सुमती** :— मेल्या हें शब्द उच्चारतांना तुझी जीभ कशी झडून गेली नाहीं ? नाहीं ऐकवत माझ्यानें हें ! देवा, कुठल्या नरकांत मला आणून टाकलंस ? ( सुधीर जवळ येतो ) दूर हो, जाऊं दे मला या नरकांतून. दूर हो. ( दरवाज्या-जवळ जाते – सुधीर हात धरतो )

**सुधीर** :— चाललीस कुठं ?

**सुमती** :— वाटेल तिथं ! तूं मला विचारणार कोण ? सोड मला मेल्या, मांगा सोड मला ! सोड ना.

**सुधीर** :— कशाला नाहक कंठशोष करतेस ? कोण येणार आहे इथं ?— मुकाट्यानं माझ्या म्हणण्याला कबूल हो !

**सुमती** :— नाहीं – नाहीं तयार होणार ! हा देह जरी नाश झाला, ह्या देहाचे राई राई येवढे तुकडे झाले तरी प्रत्येक तुकड्यागणिक, तुला हेच उद्गार ऐकायला मिळतील कीं मेल्या मांगा, ही सुमती आपलं शील भ्रष्ट करायला कालत्रयीं तयार होणार नाहीं. सोड, धांवा धांवा कुणीं तरी...

**सुधीर** :— कोण येणार धांवून इथं ?

**सुमती** :— कोण म्हणून काय विचारतोस ? माझा पाठिराखा परमेश्वर येईल, माझा दादा येईल !

**सुधीर** :— दादा ( हांसतो – हात सोडतो ) तुझा दादा ! धांवेल बरं तुझा दादा. तो बसला आहे आपल्या कर्मांचीं फळें भोगीत.

**सुमती** :— कुठं आहे माझा दादा ? माझा बंधुराज ! दादा – दादा कसारे येत नाहींस या बहिणीकरितां धांवत ?

**सुधीर** :— येईल बरं तुझा दादा धांवत ! येईल बरं ?

**सुमती** :— कुठं आहे दादा ? सांग मला माझा दादा कुठं आहे तो ?

**सुधीर** :— तुझा दादा बसला आहे कैदेंत.

**सुमती** :— काय ? दादा कैदेंत आहे ? काय केलं त्यानं ?

**सुधीर** :— काय केलं ? भोगतो आहे आपल्या कर्मांचीं फळं !

**सुमती** :— काय दादा कैदी ? कैदी ! किती भयाण शब्द !! दादा दादा ( हुंदके देते )

**सुधीर** :— पुरे झालं तुझं हें रडणं ! मरेना तुझा दादा !!

**सुमती** :— गप्प रहा राक्षसा ! असं अभद्र बोलशील तर गळा दाबून प्राण घेईन तुझा ! जा – जा काळं कर तुझं हें अपशकुनी तोंड !

**सुधीर** :— अपशकुनी तोंड अं ? बघ पहा, माझं तोंड कसं अपशकुनी आहे तें ? ( तिचा हात धरतो – इतक्यांत दरवाजावर थाप पडते ) कोण आहे ?

**आबा०** :— ( आंतून ) मी आबासाहेब !

**सुधीर** :— कोण आबासाहेब ! या थेरड्याला पण आतांच कशी वेळ सांपडली ?

**आबा०** :— ( सुधीरनें दार उघडल्यावर ) कोण सुधीर, काय चाललं आहे इथं ?

**सुधीर** :— ( बावळटासारखा ) कांहीं नाहीं, हिचं मन वळवित होतों लग्नाकरितां – पण व्यर्थ !

**आबा०** :— सुधीर तिचं मन वळवायला मी खंबीर आहें ! असल्या उठाठेवी सांगतों कोण तुम्हाला ? तुम्ही खोलीबाहेर व्हा पाहूं आधीं ! मी पहातों कशी ताळ्यावर येत नाहीं ती ? इथं लिहायचं नाहीं, तुम्ही फक्त कारकुनीच करावी, सावकारी डोकं तुम्हाला नाहीं. आधीं बाहेर व्हा. ( सुधीर दांतओठ खात जातो )

**आबा०**— सुमती तुझं काय म्हणणं आहे ?

**सुमती** :— आलास का तूं एक आणखी सैतान ? एकाची अक्कल कळली. तूं आलास का आतां इथं आपल्या अकलेचे दिवे पाजळायला ? आलास तसा चालता हो इथून.

**आबा०**— ( हसून ) एव्हांपासूनच हुकूम फर्मावूं लागल्या का राणीसाहेब ! राणीसाहेब शांत व्हा, शांत व्हा ! कशाला उगाच डोक्याला त्रास देतां ? ( जवळच्या खुर्चीवर बसतो ) सुमती अशी खुर्चीवर बैस !! अग आहे हें सारं

तुझंच आहे ! तूंच जर अशी लाजूं लागलीस, तर संसार कसा होणार ? बैस, बैस खुर्चीवर, लाजून मुरडून कां कुठं चालणार आहे आतां ?

**सुमती** :— काय बोलतां आबासाहेब हें ? कोणत्या तोंडानं मीं तुम्हांला सांगायचं. माझ्या वडिलांसारखे तुम्ही अहांत. तुम्हीच माझ्यासंबंधीं अशी वासना बाळगावी म्हणजे किती शोचनीय स्थिती आहे ! थोडा विचार करा.

**आबा०**— सुमती तत्त्वज्ञान कुणी कुणाला शिकवायचं हें तरी कळतं कां तुला ? माझ्यावर त्याचा कांहींही परिणाम होणार नाहीं. तुझ्यासारख्या अल्लड पोरीला हा वेदान्त शोभत नाहीं. वेदान्ताच्या गोष्टी साधूसंतांना, सर्वसंग परित्याग केलेल्यांना.

**सुमती** :— संसार करून तुम्हांला आतां काय मिळवायचं आहे ? काय साध्य करणार आहांत तुम्हीं ?

**आबा०** :— कां मला आतां संसार करतां येणार नाहीं ? मी निसर्ग नियमाच्या बाहेर कां गेलों आहे. बोल, सुमती अग आपण संसार करून जगाला एक धडा घालून देऊं !

**सुमती** :— धडा घालून देणार आहांत तुम्ही ? कसला ? एका कुमारिकेच्या शीलाची होळी करणार.

**आबा०** :— त्यांत कसली होळी ! अग तूं श्रीमंतींत राहाशील ! तुला चांगलीं वस्त्रं वापरायला मिळतील, तूं दागिन्यांनीं भरली जाशील आणि जगांत समाजांत सावकारीण म्हणून मानमान्यता वाढेल. ही अशी सुवर्णसंधि वाया घालवून आपल्या कांचनमय आयुष्याची माती करून घेऊं नकोस ! सुमती ये ये, अशी माझ्या जवळ बैस, आणि प्रेमाविना पारख्या झालेल्या आबासाहेबाला आलिंगन देऊन धन्य कर.

**सुमती** :— आबासाहेब कसे बोलवतात तुमच्यानें हे शब्द ! मला वाटलं होतं कीं माझ्या ह्या उपदेशानं तुम्ही ताळ्यावर याल; पण नाहीं, तुम्ही तर अगदीं नंगे बनलां अहांत ! सैताना हें तुझ्यानं कसं बोलवलं ?

**आबा०** — लागलीस का पुन्हां उपदेश करायला ? हे उपदेशाचे धडे मला नको आहेत, मला एक पाहिजे आहे. ती म्हणजे तुझी कबुली. बोल कबूल आहेस कीं नाहीं ?

**सुमती**—मेल्यांनो कितीजण तुम्ही असे अहांत? तुमचा धंदाच कां हा आहे?

**आबा०**—नाहीं, माझा तो धंदा नाहीं! मी तो धंदा जाणत नाहीं! मी फक्त एकच जाणतों, माझ्यासमोर तूं आहेस! तूं मला दिसते आहेस. या खेरीज मला कांहीं दिसत नाहीं. बोल कबूल आहेस कीं नाहीं?

**सुमती**:—देवा याकरितां कां मला जन्माला घातलंस! माझ्या जन्माचे असे धिंडवडे व्हावे हीच कां तुझी इच्छा होती? पापी आहेस तूं. परमेश्वरा—(निश्चल उभी रहाते) पैशाच्या पापी बलावर आम्हां कुमारिकांना माणुसकींतून उठविण्याचा का तुम्ही बेत केला आहे! सारं जगच कां तुझ्यासारखं पापी आहे?

**आबा**:—मला माहीत नाहीं जग पापी आहे कीं पुण्यवान आहे तें! पाप—पुण्याच्या कल्पना वेड्या कवींना! लोकांना भेडसाविण्यासाठीं कल्पनेनं पाप निर्माण करून त्याच मूर्खांनीं पुण्यवान परमेश्वराचं प्रस्थ प्रस्थापीत केलं आहे! पाप—पुण्य—परमेश्वर मीं कांहींएक जाणत नाहीं (तिचा हात धरतो) कुठं आहे तुझा तो परमेश्वर नि कुठं आहे तुझं तें पाप पुण्य? दाखीव, दाखीव मला तें!!

**सुमती**:—एका राक्षसाच्या हातून सुटलें नी दुसऱ्या सैतानाच्या तावडींत सांपडलें! सोड माझा हात.

**आबा०**:—सुटेल हं तुझा हात! हात सोडवते आहे! धरलेला हात सोडण्याकरितां नाहीं! हातांत आवडीनं घेतलेलं गुलाबाचं फूल हुंगल्याशिवाय कां कोण टाकून देतो? धडपड करूं नको, ही गुलाबाची कळी चुरगळली जाईल!

**सुमती**:—कोणीच का नाहीं येणार माझी सुटका करायला?

**आबा०**:—कोण येतो आहे तुझी सुटका करायला तें मी पहातों.

**सरला**:—(एकदम प्र. क.) पहा मी आलें आहें! आबा, काय चालविलं आहे तुम्हीं हें? (आबासाहेब हात सोडतात—कावरे बावरे) माणूस आहांत कीं कोण? इतकी तुमची बुद्धी भ्रष्ट कशी झाली?

**आबा०**:—(घाबरत) सरल ...

**सरला**:—एक शब्दही बोलूं नका! तुमच्या तोंडचे किळसवाणे शब्द ऐकण्याची माझी इच्छा नाहीं. एकदम चालते व्हा पाहूं इथून. (सरला पुढें होते तसतसे आबासाहेब एकएक पाऊल मागें जातात) का—थांबलांत कां?

( कांहीं न बोलतां थांबतो ) माणूसरुपी सैताना ऐकायला येत नाहीं तुला ? ( आबासाहेब बोलण्याचा प्रयत्न करतो ) काळं कर इथून ( एकदम बाहेर जातो ) सुमती —

**सुमती** :— ( मिठी मारते ) ताई,–अगदीं ऐनवेळीं धांवून आलीस ! तूं आली नसतीस – तर-तर काय झालं असतं ? नको – नको – ती आठवण...

**सरला** :— सुमती शांत हो ! भिऊं नको ! आतां मी आहें ना ! कुणालाही येऊंदे, प्रत्यक्ष कृतांत काळ जरी आला तरी त्याला सुद्धां तुझ्या चरणीं नमवायला लावीन ! ( अश्रू पुसते ) असं रडून कसं चालेल !

**सुमती** :— सरलाताई, मला कांहीं सुचेनासं झालं आहे ! या घरांत क्षणभर सुद्धां राहणं मला धोक्याचं वाटूं लागलं आहे ! जातें मी.

**सरला** :— तूं जाणार ? एका क्षुल्लक कामांधाला भिऊन जाणार ? आपण स्त्रिया अशा भिऱ्या आहोंत म्हणूनच आपल्याला या नरकयातना सोसाव्या लागत आहेत. सुमती, तूं इथंच रहा ! !

**सुमती** :-- आतांसारखा प्रसंग आला तर ?

**सरला** :— तर काय ( पदराआड आणलेला जंबिया तिला देते ) हा जंबिया, हा पोलादी परमेश्वर त्या प्रसंगांतून केव्हांही तुझं रक्षण करील ! हा तुजजवळ ठेव. जर कुणी आलं तर याच्या साह्यानं, त्याला त्याच्या कृतीचं प्रायःश्चित्त भोगायला लाव. प्रत्येक स्त्रीनं स्वतःच्या संरक्षणासाठीं असंच हातीं शस्त्र धरायला पाहिजे, तरच साऱ्या स्त्रीजातीची विटंबना थांबेल ! कळलं सुमती ?

**सुमती** :— ( जंबियाकडे पहात ) खरोखरच याचं तेज कांहीं अलौकिक आहे. सरलाताई आतां कुणीही येवो, तुझ्या ह्या धीराच्या बोलानं आणि ह्या पोलादी ईश्वराच्या साह्यानं ही सुमती स्वतःचं संरक्षण करण्यास समर्थ झाली आहे.

( पडदा पडतो. )

---

# अंक ३ रा



## प्रवेश १ ला



[ रामजीचें घर, सरला आणि रामजी ]

**रामजी** :— सरलाबाई, असा विचारांत वेळ घालवून कसं चालेल! प्रत्येक क्षण अमोलिक आहे! अशा निरुत्साही बनूं नका. आम्हां शेतकरी बांधवांबद्दल तुमचं हें प्रेम पाहिलं कीं खरोखरच आश्चर्य वाटतं. भांगेपोटीं तुळशीचा जन्म कसा व्हावा? गारगोटीच्या पोटीं हिरकणी कशी जन्माला यावी याचा अचंबा वाटतो! शेतकऱ्यांना चरचरा कापणाऱ्या आबासाहेबांच्या आपण कन्या आहांत, असं जर कुणाला सांगितलं तर तें खरं सुद्धां वाटणार नाहीं! सरलाताई अशा स्तब्ध काय बसलांत? कां आल्या आहांत तुम्ही माझ्याकडं?

**सरला** :— कां आलें? रामजीबाबा कुठल्या तोंडानं तुम्हांला सांगूं? आमचं घर, म्हणजे खरोखरच विषारी वायूनं कुजबुजलेले, सज्जनाच्या छळाचं आगर आहे! त्यांत वावरणारे ते दोन नर पशू जिवंत आहेत तोंपर्यंत तरी सज्जनांचा त्यांत निभाव लागणार नाहीं. ज्याला मी भीत होतें, तेंच संकट माझ्या-पुढं दत्त म्हणून उभं राहिलं आहे. जी सांगण्याची वेळ येऊं नये, ती सांगण्याची वेळ आली आहे.

**रामजी** :— म्हणजे, तुम्ही बोलतां आहांत त्याचा अर्थच मला कळत नाहीं. काय झालें, सरलाताई? अविनाशनां पकडलं हेंच ना? त्याला आपण काय करणार? सत्तेपुढं शहाणपण नाहीं! पैशाच्या जिवावर वाटेल तीं नीच कृत्यें करतां येतात. पैसा असल्यावर कांहींही जिरलं जातं! गरिबीमुळं माणसाची मान-खंडना होते, तर श्रीमंती, गरीबाची मानखंडणा करून माणसाला अधःपतनाचा मार्ग दाखवून त्याला रौरव नरकाचा वांटेकरी बनविते. सरलाताई अशी कोणती स्थिती प्राप्त झाली आहे, कीं त्यामुळें तुमचा उत्साह नाहींसा होऊन तुम्ही अशा निरुत्साही बनल्या अहांत?

**सरला** :— होय, अशी स्थिती प्राप्त झाली आहे कीं ती सांगायला सुद्धां माझ्या जिवावर येतें. मी सांगते ते तुम्ही अविनाशनां जाऊन कळवाल का, तुम्हाला त्यांची भेट घेतां येईल का ?

**रामजी** :— तसंच कांहीं महत्त्वाचं असेल, तर मी कसंही करून त्यांची भेट घेईन ! सांगा सांगा, सरलाताई जें कांहीं असेल तें अगदीं शांत चित्तानं सांगा, मुळींच संकोच बाळगूं नका, सांगा !

**सरला** :— रामजी बाबा, माझ्या बाबांनीं–बाप कसला तो सापच नाहीं कां ? त्या सापांनीं – निर्दय कसाबांनीं, आपल्या पाशवी कामवासनेच्या तृप्तीसाठीं सुमतीला पळवून आणून तिचे धिंडवडे चालविले आहेत.

**रामजी** :— अरेरे ! किती नीच हृदयाचा माणूस आहे हा ! अविनाशला यांत काय कळवायचं ?

**सरला** :— एवढंच, दुसरं कांहीं सांगूं नका त्यांना ! म्हणावं सुमती सरलेकडे आहे. हें एकून निदान एवढं तरी वाटेल कीं सुमती सुरक्षित आहे, आणि माझ्या सहवासांत आहे. इतकं कळल्यानंतर दुःखांत सुखाचा क्षणिक तरी आनंद होईल ? सांगाल ना ! रामजीबाबा सांगाल माझा एवढा निरोप ? बाबा – तुम्हालाच मला बाबा म्हणून हांक मारावीशी वाटते – बाबा, मी श्रीमंतींत जन्माला न येतां, तुमच्यासारख्या थोर अंतःकरणाच्या शेतकऱ्याच्या पोटीं आलें असतें तर मी स्वतःला मोठी भाग्यवान् समजलें असतें. पण नाहीं. तेवढं भाग्य कुठचं या दुर्भागिणीला ! बाबा – बाबा – तुम्हीच माझे बाबा ! पुरवाल ना आपल्या मुलीचा एवढा हट्ट ? म्हणावं सरला आपली मूर्ती डोळ्यापुढं आणून सारखी ध्यान लावून बसते; बाबा, ही आपल्या मुलीची इच्छा नाहीं का आपण पुरी करणार ? ( हुंदका )

**रामजी** :— ( जवळ जाऊन पाठीवरून हात फिरवितो ) उगी – बाळ असं रडूं नये – उगी – उगी रहा कशी ? होणाऱ्या गोष्टी कां कुठं चुकत असतात ! कां विनाकारण मनाला लावून घेतेस, गप्प रहा कशी !

**सरला** :— बाबा गप्प कशी राहूं मी ? माझ्या साऱ्या आकांक्षा नाहींशा झाल्या, मनांत रचलेले कल्पनेचे मनोरे क्षणांत ढासळून चक्काचूर झाले, कसं मला गप्प राहावेल ? डोळ्यापुढं सारीं चित्रं उभीं राहिलीं कीं माझी स्थिति अगदीं वेड्यापिशासारखी होते, बाबा – बाबा याला उपाय आहे का हो ?

**रामजी** :— उपाय कसला असणार बाळ ? कांहीं नाहीं बरं उपाय ! जो–जो आपण उपाय करूं लागूं, तों तों अविनाश अधिक गुंतला जाईल ! भविष्य-काळच्या आकाश कंदिलाकडं दृष्टी टाकून, आपल्या साऱ्या आशा–आकांक्षा अधांतरीं तरंगत ठेव नी मनाचं समाधान कर, याखेरीज काय उपाय आहे !

**सरला** :— बरं येतें तर, तिकडे सुमतीची काय स्थिति झाली असेल ! माझा जीव सारा तिकडं लागला आहे. मनांतलं सारं तुम्हांला सांगितलं – बाबा जातें बरं. ( जाते )

**रामजी** :— गेली बिचारी ! परमेश्वरा, गरिबांना छळणं हेंच कां तुझं ब्रीद आहे ? देवा —

**कोकिला** :— ( प्र. क. ) काय झालं बाबा ?

**रामजी** :— काय व्हायचं ? कोकिला, कोकिला – एक क्षणभर सुद्धां इथं बसणं मला अशक्य झालं आहे, माझ्या शिरावरची कामगिरी मला पुरी केलीच पाहिजे !

**कोकिला** :— कसली कामगिरी – मला तर सांगा बाबा, माझ्याकडून होण्या-सारखी असेल तर ती मोठ्या आनंदानें करीन.

**रामजी** :— तुझ्यानं नाहीं व्हायची ती – पोरी त्याला पुरुषच पाहिजे,– तुझ्यामुळं नाहक अनर्थ मात्र ओढवेल.

**कोकिला** :— पण सांगा तर खरी कामगिरी ! माझ्याकडून नाहीं, मी दुसऱ्याकडून करवीन— पण माझं आपल्या मुलींचं कर्तव्य म्हणून कुणीकडून का होईना मी आपल्या डोक्यावरची जबाबदारी कमी करीन.

**रामजी** :— शाबास पोरी ! आतां मला समाधान वाटलें. कुणाकडून करविणार ही तूं कामगिरी ? मला त्याचं नांव सांग ?

**कोकिला** :— पण कामगिरी काय आहे ती सांगाल कीं नाहीं ?

**रामजी** :— अविनाशला जाऊन निरोप सांगायचा आहे कीं तुझी बहीण आबासाहेबाकडे आहे.

**कोकिला** ;— काय, सुमती आबासाहेबांकडे आहे ?

**रामजी** :— होय, त्यांनींच तिला पळवून आणली आहे ! त्या अनाथ निर्मल बालिकेचे, त्या चांडाळानें हालहाल मांडले आहेत. परमेश्वर कुठें दडला आहे

कोण जाणें ? खरोखर, परमेश्वर सत्याचा वालीही नाहीं नि दीनांचा त्राताही नाहीं ! सारी दुनिया असत्यानें आणि अनितीनें भरली आहे, (क्षणभर थांबून ) पण कोकिले कोण कामगिरी करणार आहे ग ?

**कोकिला**:—अहो आपल्याकडे ते वसंतराव येताता ना त्यांना सांगणार आहें मी.

**रामजी**:—वसंताला ? वा ! छान ! तो करील ! त्याची ओळख बरी आहे. एखाद्या अधिकाऱ्याच्या वशिल्यानें तिथं जाऊन अगदीं बिनबोभाट काम करील ! सांग लौकर त्याला; जितका लवकर निरोप पोहोंचेल तितका बरा ! कारण बहिणीच्या खुशालीची जिज्ञासा लागून राहिली असेल अविनाशला. जातों हं. ( जातो )

**कोकिला**:—बाबा तर गेले, आतां ही कामगिरी वसंताना सांगायची आहे. पण स्वारी तरी कुठं लौकर भेटणार आहे ? जिथं झुकेल तिथं झुकेल ! मग कशाचीसुद्धां शुद्ध राहात नाहीं त्यांना. अगदीं एकवल्ली मूर्ति. केव्हां येतील कोण जाणं ! यायची वेळ तर टळून गेली—केव्हां येणार बरं ?

**वसंत**:—( प्र. क. ) केव्हां येणार म्हणून काय विचारतेस ? अग हा आलोंच कीं ! कां ? आज इतकी माझी मार्गप्रतीक्षा कां चालली आहे ?

**कोकिला**:—कां, मार्गप्रतीक्षा करूं नये वाटतं ? कां त्या मार्गप्रतीक्षेला सुद्धां भिता ? भित्रे भागुबाई खरे ! आणि म्हणे आम्ही पुरुष ! काय बघा पुरुषांचं तोंड ! दिवे ओवाळा दिवे !

**पद**

**या भिरूं अवतारा**
**दिपांनीं दिपवूंया ॥ धृ० ॥**
**मूर्ति बघुनी ही असली ।**
**हृदयीं साभिमान पसरी ।**
**दिव्य करणीं दिपवी मना ॥ १ ॥**

**वसंत**:—दिवे ओवाळायची आवश्यकता नाहीं कोकिले ! अग तुझ्यासारखी तेजो तारका मला प्रत्यक्ष प्राप्त झाल्यानंतर दिव्यांचें तेज काय पडणार ? कोकिले, खरं सांग, अगदीं खरं सांग हं, कां बरं तूं माझी चातकाप्रमाणें वाट पहात होतीस ?

**कोकिला**:—सांगूं, तसंच अतिशय महत्त्वाचं काम आहे ! आणि म्हणूनच

आपली वाट पहात होतें. चला तुम्हांला एकान्तांत सांगतें काय काम आहे तें !

**वसंत** :— एकांतात ! फार छान ! पण तिथं कुणी नाहीं ना ?

**कोकिला** :— दुसरं कुणी नाहीं, बाबा आहेत !

**वसंत** :— कोण म्हातारा ? अरे बापरे; मग मात्र भरलीच आमचीं शंभर वर्षें ! जातों – जातों – मी – ( जाऊं लागतो )

**कोकिला** :— कुठं चाललांत ? पण मी जाऊं देईन तेव्हां ना ? कसें जातां तेंच मी पहातें. चला माझ्याबरोबर.

**वसंत** :— कोकिले, कोकिले काय हें – नको – नको मी जातों आपला ! सोड सोड मला ?

**कोकिला** :— हो सोडतें तर ! माझा हक्क आहे तुमच्यावर. मीं सांगेन तसंच वागलं पाहिजे तुम्हांला. गडबड कराल तर बाबांना हांक मारीन, नाहींतर निमुटपणें चला माझ्याबरोबर.

**वसंत** :— ( हात जोडून ) देवी चंडिके येतों तुझ्या बरोबर, पण त्या म्हाताऱ्याला बोलवूं नकोस. कारण तुझ्या आणि माझ्या या एकांतांत तो म्हातारा कशाला उगाच ?

**कोकिला** :— चला तर—

( पडदा पडतो )

---

## प्रवेश २ रा



[ मध्यान्हीचा समय ! गांवाबाहेरील पडकें देऊळ. ]

( आनंद बावरलेला प्र. क. )

**आनंद** :— काय वाजलं ? कोण आलं कां ? मला राहून राहून भीति कां बरं वाटते आहे ? माझं मन मला भेडसावीत आहे. मन पापी असतं नि पाप भित्रं असतं हें कांहीं खोटं नाहीं— माझ्या आतांपर्यंतच्या आयुष्यांत मीं काय केलं ? किती नीच कृत्यें केलीं असतील बरं मीं ? मला काय कमी होतं ?

आबांच्या म्हणण्याप्रमाणें वागलों असतों तर..... पण, छे...... असल्या भीरू विचारांना मनांत जागाच देतां नये ! या आनंदाचं ध्येय म्हणजे चैन ! मग त्या चैनींत असल्या भेकड गोष्टी कशाला पाहिजेत. त्या दिवशीं आबांच्या तिजोरींतून पैसे आणले, आणि हे दागिने त्या विश्रामपूरच्या सावकाराकडे चोरी करून हस्तगत केले, पण पैसे किती दिवस पुरले ? पुरते पांच दिवस सुद्धां नाहींत ! हे दागिने फक्त राहिले आहेत; पण त्याची विल्हेवाट कशी लावायची ? दागिने चोरीचे आहेत हें कळतां नये, कारण त्या विश्रामपूरच्या सावकारानें चोरीची बातमी पोलिसांना दिली असणारच आणि पोलीस खात्यांतले ते यमदूत. माझ्या पाळतीवर निशाचरासारखे राहिल्याशिवाय कसे राहातील ? म्हणून याची योग्य तऱ्हेनंच वाट लागली पाहिजे. सुधीरना बोलाविलें आहे खरें. अजून सुधीर कां बरं आले नाहींत. (समोरून काळी आकृती येतांना दिसते) कोण – कोण तें ? मला पकडण्यासाठीं तर कुणी आलं नाहीं ना ?

**सुधीर** :— ( हांसत प्र. क. ) आनंद घाबरूं नकोस असा, मी सुधीर आहें !

**आनंद** :— कोण सुधीर, अगदीं नखशिखांत भुताचा अवतार धारण केला आहांत कीं !

**सुधीर** :— होय, मला भूत बनायचं आहे ! माणसांतून माणुसकी नाहींशी झाली कीं त्याला सैतान बनायला कांहींही वेळ लागत नाहीं.

**आनंद** :— होय मलाही तसंच वाटतं आहे.

**सुधीर** :— तुला नुसतं तसं वाटतं आहे. पण मी तें कृतींत उतरविणार आहे. मला माझ्या अपमानाचा सूड उगवायचा आहे !

**आनंद** :— तो मग उगवा. पण प्रथम आपल्या यांचं काय करायचं ?

**सुधीर** :— कसलं ? अरे काम काय आहे हें सांगितलं सुद्धां नाहींस आणि काय करायचं म्हणून विचारतोस !

**आनंद** :— सांगतों ( दागिने पुढें करून ) हें पहा, हे दागिने आपल्याला विकायचे आहेत; मी विकायला जाऊन चालणार नाहीं.

**सुधीर** :—(हातांत दागिने घेऊन) मग काय म्हणणं आहे तुझं ? मी ते विकावे म्हणून ? पण मी असं म्हणतों कीं आपण दोघेही बरोबर असलों तर कुणालाहि संशय येणार नाहीं.

**आनंद**:— बरं मग उद्यां सकाळीं विकायला कांहीं हरकत नाहीं.

**सुधीर**:— तूं सांगशील तेव्हां येण्याची माझी तयारी आहे.

**आनंद**:— अस्सं, मग उद्यां सकाळलाच. हो पण सुधीर सरासरी किती रुपये येतील असं वाटतं तुम्हांला ?

**सुधीर**:— याचे ना ? हजार एक रुपये यायला पाहिजेत.

**आनंद**:— बस हजारच ? तेवढ्यानं काय होणार ? ज्यानं जवळ जवळ पांच हजार रुपये पांच दिवसांत धुळीला मिळविले त्याला एक हजार रुपये किती दिवस पुरणार ? छे, मला माझ्या आयुष्यभर चैन करतां आली पाहिजे.

**सुधीर**:— पण आबासाहेब आहेत तोंपर्यंत तरी.

**आनंद**:— होय ! हा कांटा कसा दूर व्हायचा ? तें कांहीं नाहीं, माझ्या सुखाच्या — आशा हिरवळींत असलेला हा कांटा मला उपटून टाकलाच पाहिजे.

**सुधीर**:— पण आनंद तें शक्य नाहीं. आबासाहेब तुझे वडील आहेत.

**आनंद**:— असेनात का ? पण जो बाप मुलाच्या सुखाची कोणत्याही तऱ्हेनें दाद घेत नाहीं, त्याला त्या मुलाकडून योग्य तेंच शासन मिळालं पाहिजे. याला एकच उपाय, त्या थेरड्याचा खून !

**सुधीर**:— ( खोट्या आश्चर्यानें ) काय खून आणि तो कोण करणार ?

**आनंद**:— नाहीं — करविणार !

**सुधीर**:—कुणाकडून ?

**आनंद**:— मारेकऱ्याकडून !

**सुधीर**:— तें उघडकीस आलं तर ?

**आनंद**:— मग काय करायचं ?

**सुधीर**:— मी सांगतों त्याप्रमाणें तयारी आहे तुझी ?

**आनंद**:— तो मार्ग योग्य आहे असं वाटलं तर केव्हांही.

**सुधीर**:— पण त्याला एक अट आहे माझी ! ती तूं पुरी करणार असलास तर सांगतों.

**आनंद**:— माझ्याकडून होण्यासारखी असेल तर खात्रीनं पुरी करीन.

**सुधीर** :— आबा वारल्यानंतर ताबडतोब मला दहा हजार रुपये पाहिजेत.

**आनंद** :— ती सगळी इस्टेट मिळाल्यानंतर दहा हजारच काय वाटेल तेवढें देईन !

**सुधीर** :— होय ना ?

**आनंद** :— हो ! पण मार्ग बेमालूम पाहिजे !

**सुधीर** :— बेमालूम म्हणजे इतका, कीं, कडेच्या कुडालासुद्धां कळणार नाहीं ! ऐक, आबासाहेबांनीं सुमतीला पळवून आणली आहे, आणि तिच्याशीं ते बळजबरीनं लग्न करूं पहात आहेत अशा परिस्थितींत जर त्यांचा खून आपण तिच्याच खोलींत केला, तर आपला संशय न येतां तिचा येईल. परस्पर साऱ्या गोष्टी होऊन आपलं काम फत्ते होईल ! !

**आनंद** :— वाः अतिशय नामी युक्ती ! हो तें उद्यां रात्रीं कारस्थान करायचं, पण मला उद्यां सकाळीं पैसे पाहिजेत.

**सुधीर** :— तें तर ठरलेलं आहेच ! चला तर रात्र बरीच झाली आहे ! आज आमच्याचकडे झोंपा, उद्यां उठून आपण पुढील उद्योगाला लागूं ! ( आनंद जातो. ) या सुधीराच्या अपमानाचा सूड हा सुधीर उद्यां घेणार, ज्यां सुमतीच्या देखत त्या थेरड्यानं माझा पाणउतारा केला, तिच्या पुढं उद्यां आबासाहेबांना मी माझ्या कारकुनी डोक्याचं पाणी दाखविणार आणि त्या घमेंडखोर पोरटीला माझ्या विषयलालसेला बळी पाडणारच पाडणार, तरच नांवाचा सुधीर कारकून ! ( जातो. )

---

## प्रवेश ३ रा



( तुरुंग )

**अविनाश** :— साऱ्या शेतकरी समाजाचें " ऐक्य बंधन " करून अखिल महाराष्ट्रांत सावकारशाहीशीं न्यायानं लढून आम्हां शेतकरी समाजाला " पहिला विजय " मिळाला म्हणून मी आनंदाच्या उत्तुंग शिखरावर आरूढ झालों होतों. परंतु आबासाहेबांसारख्या नराधमानं आपल्या " दानवी लीलेनं " माझ्यावर

"सवाई सूड" उगवून मला हा असा "बंदीवान" केला, आणि दुःखाच्या खोल गर्तेत लोटून दिलं! परमेश्वरा! सत्यानं वागणं हा गुन्हा तर नव्हे ना? सत्य! सत्य!! सत्य!!! चराचर सृष्टी व्यापून राहिलेलं हें सत्य, माझ्यासारख्या निरपराधी माणसाच्या आयुष्याचा नाश करण्यास कारणीभूत होत असेल, तर त्याची जगांतून कायमची हकालपट्टीच झाली पाहिजे!! (थोडा वेळ थांबून. विचार करून) पण वेड्यासारखं काय मी बडबडतों आहे? समाजांत वावरणाऱ्या कांहीं समाजविघातकांनीं स्वार्थांध बनून माझ्यावर हा चोरीचा आळ आणला म्हणून त्यांच्या त्या कसाब करणीनं मीं जगांतील त्रिकालबाधित सत्यावर शिंतोडे उडवून तें जगांतून नाहींसें करण्यास प्रवृत्त व्हावें? किती अयोग्य केलं मीं. "सत्यमेव जयते!" ही पूर्वापार चालत आलेली म्हण असत्य कशी बरं होऊं शकेल? जगाच्या अंतापर्यंत हें सत्यच राहाणार. मानवी जीवन हें काय आहे हें अद्यापपर्यंत कधींच कुणाला सांगतां आलें नाहीं आणि तें येणारही नाहीं. ज्याला आपल्या जीवनाचा अर्थ समजावून घ्यायचा असेल त्यांनीं नुसत्या मनोरम्य कल्पना करून चालणार नाहीं. जीवन ही लढाई आहे, असं नुसतं म्हणण्यांत काय अर्थ आहे? लढाई म्हटल्यानंतर लढाईंत होणाऱ्या प्राणान्तिक वेदना माणसानं सहन केल्याच पाहिजेत. त्या ज्याला सहन करितां येणार नाहींत तो माणूस म्हणून जगायला नालायक ठरेल! मग मी असा भांबावून कां बरं गेलों? अविचार आणि विकार! अविचारानं माझ्या मनावर विकाराचं दडपण टाकलं, आणि म्हणून माझी स्थिति अशी भांबावल्यासारखी झाली. स्वसुखाला आंच लागल्यामुळं सुविचाराचं ठाण डळमळीत झालं आणि म्हणून मी सत्याला आणि नीतीला पायाखालीं तुडवायला तयार झालों. पण थांब मना, असा बावरूं नको, माझा नश्वर देह जरी या चार भिंताडांत बंदीवान झाला असला, तरी जगांत अशी एकही व्यक्ति नाहीं कीं ती या अविनाशाच्या स्वतंत्र मनावर आपला ताबा चालवूं शकेल. (थांबून) पण नाहीं कशी? माझ्या मनावर ताबा चालविण्याची शक्ती माझ्या सरलेंत नाहीं का? हो, ती काय ती एकटी माझ्या मनावर ताबा चालवूं शकेल! हो, पण ती या कार्यात तरी माझ्या आड येणार नाहीं, या गुलामगिरीची शृंखला तोडतांना ती मला कशी बरं अडथळा करूं शकेल? खात्रीनं नाहीं. उलट ती मला साहाय्यच करील! मग असं असल्यावर या चार भिंतीच काय पण मेरू हिमाचलासारखे हजारों पर्वत जरी माझ्या कार्यासमोर आणून उभे केले तरी मला त्याची पर्वा नाहीं.

**वसंत** :— ( शिपाई वसंताला आंत आणतो ) अविनाश !

**अविनाश** :— कोण वसंत ? कां आलास ? मला भेटायला आलास ?

**वसंत** :— होय, तुला भेटायला आलों आहे !

**अविनाश** :— मला भेटायला आलास ? कां ? मला भेटून काय मिळणार ? समाजांतून उठलेल्या, समाजानं नालायक ठरविलेल्या या अविनाशला कां भेटायला आलास ?

**वसंत** :— अविनाश, असं वेड्यासारखं काय बडबडतोस ? तुला नालायक ठरवायला समाज इतका कृतघ्न नाहीं ! सावकारी कारवाईनं तूं बदमाप ठरला असलास तरी सारा शेतकरी समाज तुला हीन कधींही लेखणार नाहीं. शेतकऱ्या-करितां, रात्रंदिवस झटणाऱ्या या एकनिष्ठ सेवकाला अशा तऱ्हेच्या हीन पदवीनं भूषवायला महाराष्ट्र कृषिवल कसा बरं तयार होईल ? महाराष्ट्राचा कृषीवल सत्य-धर्मी आहे ! तो सत्यानंच वागेल, सत्यच सेवन करील आणि सत्याकरितां वेळीं प्राणही अर्पील ! ! अविनाश तूं जरी असा बंदीवान झाला असलास तरी हा तुझा विजयच आहे ! समरांगणावर जय आणि पराजय यांना प्रमुख स्थान नाहीं. लढतां लढतां मरण आलं तर तो त्या वीराचा गौरवच होय ! पण शत्रूला पाठ दाखवून पळून जाणं हें भ्याडपणाचं आहे ! ! तसा तूं पळाला नाहींस, सत्य आणि असत्य यांच्या महायुद्धांत आपल्या छातीचा कोट करून वाटेल ते आघात सहन करायला तयार होऊन असा बंदीवान झालास म्हणून तुझी योग्यता कमी न होतां, त्यामुळं तुला मानाचीच पायरी प्राप्त झाली आहे.

**अविनाश** :— वसंता, माझ्या शुष्क जीवनांत वसंत ऋतू फुलविण्यासाठीं कां तूं इथं आला आहेस ? पण वेड्या, तुला माहीत नाहीं, इथल्या या गुलाम-गिरीच्या तीव्र तापानं, ती टवटवीत गोजीरवाणीं फुलं—मंद वाऱ्यानं डौलानं डुलणाऱ्या त्या लता, तो आम्रवृक्ष इथं कोमेजून त्याचा पाचोळा होईल तो ! वसंता खरं सांग, तूं कशाला आला आहेस ?

**वसंत** :— कशाला आलों आहे ? काय सांगूं ?

**अविनाश** :— सांग, वसंता, थांबलास कां ? सांग कशाला आलास ? बोल लौकर बोल ? ओठांवर येणारे शब्द असे दाबून कां टाकतो आहेस ? मला दुःख होईल म्हणून तुला भीति वाटते, सुख आणि दुःख ! साऱ्याची परिसमाप्ती

झाली आहे ! सुखदुःख मी सारखंच समजतों. बोल कांहीं असेल तें अगदीं स्पष्ट सांग, मुळींच संकोच बाळगूं नकोस ! अरे भडकल्या आगींत उडी घेतल्यावर आंग पोळेल म्हणून भिऊन कां कुठं चालत असतं.

**वसंत** :— सुमती......

**अविनाश** :— सुमती ? सुमतीचं काय झालं ? कुठं आहे सुमती ?

**वसंत** :— सुमती आबासाहेबांकडे आहे.

**अविनाश** :— ( आश्चर्यानें ) काय आबासाहेबांकडे ? कुणी सांगितलं तुला ?

**वसंत** :— सरलाताईनीं सांगितलं आणि म्हणाल्या कीं, सुमती माझ्याकडे आहे, कांहीं काळजी करूं नका !

**अविनाश** :— कुणी सरलेनं सांगितलं ? माझी सुमती सुखी आहे ? वसंता, तुझ्या नांवाप्रमाणं तूं खरोखर वसंत आहेस. आतांच्या तुझ्या या वाणीनं माझ्या या बंदिवासांतल्या शुष्क वातावरणांत तूं वसंत ऋतु फुलविलास. पण सुमती खरंच सुखी आहे का ? आबासाहेबांसारख्या सैतानाच्या पाशांतून सरला तिचं रक्षण करूं शकेल का ? वसंता सरलेनं आणखी कांहीं सांगितलं आहे कां तुला ?

**वसंत** :— अधिक कांहीं सांगितलं नाहीं ?

**अविनाश** :—अधिक कांहीं सांगितलं नाहीं ? सरल खरंच कां तूं तिचं रक्षण करूं शकशील ? नाहीं—नाहीं त्या नराधामाच्या दानवी लीलेपुढं तिचा कसा बरं टिकाव लागेल ? तो आपल्या कसाब करणीनं सुमतीच्या जिवाची दशा केल्याविना राहाणार नाहीं ! सुमती—सुमती माझ्या जिवाच्या भगिनी ! बाबांनीं आपल्या शेवटच्या वेळीं मला सांगितलं होतं, बाळ अविनाश माझ्या या कोवळ्या सुमनाला समाजांतील तीव्र तापाच्या संपर्कानं कोमेजूं देऊं नकोस ! बंधु—प्रीतीच्या ओलाव्यानं तिची जीवन—लता सदा टवटवीत राहूं दे ! कुठल्याही गोष्टीचं दुःख लाभूं देऊं नकोस तिला ! ही माझ्या बाबांची शेवटची इच्छा मला पुरी करतां आली नाहीं. बाबा ! स्वर्गांत तुमच्या आत्म्याला किती बरं यातना होत असतील ? बाबा—बाबा—हा तुमचा अविनाश आपल्या कर्तव्याला विसरला नाहीं, बाबा—बाबा स्वर्गांतून माझ्याकडं अशा तीव्र दृष्टीनं पाहूं नका, तुमचा अवी साऱ्या शेतकरी समाजाचं रक्षाबंधन आपल्या हातीं बांधून, या जिवांत जीव असेपर्यंत आपली इच्छा पुरी केल्याशिवाय कधींही राहाणार नाहीं.

**वसंत** :— अविनाश शांत हो ! शांत हो ! असं वेड्यासारखं काय करतोस ?

**अविनाश** :— कसा शांत होऊं वसंता ? जिव्हारी लागलेल्या वेदना मला नाहींरे आतां सहन होत ! गतस्मृतीची भेसूर भूतं दृष्टीसमोर नाचूं लागलीं कीं काय करूं नी काय नको असं होऊन जातं ! हृदयांत कसा ज्वालामुखी पेटला आहे माझ्या, काय सांगूं तुला ?

**वसंत** :— अविनाश........

**शिपाई** :— टाईम झाला साहेब चला लौकर ( अविनाश कांहीं बोलत नाहीं. वसंत दुःखी अंतःकरणांन जातो. )

**अविनाश** :— सरल, तूं सुमतीकरितां काय वाटेल तें करूं शकशील, मला खात्री आहे त्याची, पण त्या बदमाषापुढं तुझा निभाव लागणं शक्य नाहीं. मला समाधान लाभावं—म्हणून वसंताकडून हा निरोप पाठविलास हें योग्यच केलंस ! सरला तुझ्या नांवाप्रमाणें तूं सरळ अंतःकरणाची आहेस ! पण आम्हा दोघां बहीणभावंडांसाठीं, तुला किती बरं यातना भोगाव्या लागत असतील ? आमच्याकरितां यातना सहन करण्याचं सामर्थ्य दाखवून माणूस धर्म पाळणाऱ्या सरलेसारख्या, सरळ हृदयी स्त्रीला अधिक संकटांत लोटणं योग्य नव्हे ! त्याकरितां माझ्या कर्तव्य—पालनाकरितां मला हा गुलामगिरीचा पाश झुगारून दिलाच पाहिजे ! स्त्रियांचं रक्षण करणं हें पुरुषांच कर्तव्य असतांना, माझ्यासारख्या पुरुषानं या चार भितांडाच्या गुलामगिरींत खितपत पडून कसं चालेल ? तें कांहीं नाहीं. आज बंदिवासांतून हा अविनाश मुक्त झाल्याशिवाय कधींही राहणार नाहीं ! माझ्या सुमती बहिणीच्या आणि सरलेच्या मदतीसाठीं कृतांत काळासारखा धांवत जाऊन समाजांत वावरणाऱ्या नराक्षसांच्या नरडीचा घोट हा अविनाश घेणारच घेणार !! ( पडदा पडतो )

---

## प्रवेश ४ था



( आबासाहेबांचा वाडा. आबासाहेब जळफळलेल्या वृत्तींत )

**आबा०** :— ( फेऱ्या घालीत असतात ) अखेरीस या वेळींही मी तोंडघशीं पडलो हं ? काय करूं रे, ज्या आबासाहेबांनं स्वप्नांत सुद्धां पुढं टाकलेलं पाऊल

मागं घेतलं नाहीं; त्याला त्याच्या पोटच्या पोरीनें असं नामोहरम करावं कां ? एकवेळ सूर्य आपली प्रखरता कमी करील, सागर क्षारता टाकून देईल, सर्प गरळ ओकण्याऐवजीं अमृताच्या गुळण्या टाकील पण हा आबासाहेब आपल्या निश्चयापासून केसभरही ढळणार नाहीं ! सरल ! सरल ! ! माझी पोटची मुलगी पण शत्रूप्रमाणें वाटते आहे. जिनं माझ्या प्रत्येक शब्दाला निमूटपणें मान तुकवावी, जिनं माझ्या तोंडाचा उद्गार वेदवाक्य समजून त्याप्रमाणें वागावं, त्याच माझ्या पोरटीच्या शब्दाला भिऊन मीं भेकडपणानं मागं सरावं का ? कां मी मागें सरलों ? माझंच मला आश्चर्य वाटतं ! ! तें कांहीं नाहीं, माझ्या आत्म-सुखाची मी पूर्तता करणारच ! मग त्या माझ्या कार्याआड प्रत्यक्ष परमेश्वर जरी आला तरी त्याला माझ्या लाथेच्या ठोकरीनं मी पाताळांत दडायला लावीन. ( पडदा उचलतो )

**सरला** :—( प्र. क. ) परमेश्वराला दडायला लावणार ? बाबा अजून तुमच्या डोळ्यांवरील धुंदी उतरली नाहीं.

**आबा०** :—कोण – सरल ? ( भेदरट दृष्टीनं पहात )

**सरला** :—आबा, पाहातां काय असे माझ्याकडं ? तुमच्या दृष्टींतील पापी वासना अजून कायम आहे का ?

**आबा०** :—माझी दृष्टी पापी ?

**सरला** :—होय तुमची दृष्टी पापी ! तुमची करणी पापी ! ! तुम्ही पापी ! ! माणसाच्या मनोभूमींतील सुविचारी वृक्षाला, वासनेची एकदां कीड लागली कीं ती इतकी फोफावते कीं माणसाच्या साध्या शब्दोच्चारांत, दृष्टिक्षेपांत, कर्मकृत्यांत सर्वथैव ते जंतु प्रसरण पावतात. शारिरिक महारोगी पत्करला, पण मानसिक महारोगानं पछाडलेला माणूस फार घातक असतो ! तसा तुमच्या मनाला वासनेचा महारोग झाला आहे ! तुम्ही महारोगी अहांत !

**आबा०** :—मी महारोगी ! सरले ! तूं कुणांपुढं बोलते आहेस माहीत आहे ना तुला ?

**सरला** :—माहीत आहे मला ! एका कामांधापुढं बोलतें आहे तें माहीत आहे मला.

**आबा०** :—सरले, मी बाप आहे तुझा !

**सरला** :— तिथंच मुळीं माझं नशीब फुटलं आहे ना ! अबलांच्या शीलांची राखरांगोळी करणाऱ्या तुमच्यासारख्या कसाबाची मी मुलगी आहें याचंच मला राहून राहून वाईट वाटतं !

**आबा०** :— कसाब, मला कसाब म्हणतेस ? सरले, तोंड आंवरून बोल ! कांहीं मर्यादा आहे कीं नाहीं तुला ?

**सरला** :— मर्यादा ! आग लावा त्या मर्यादेला ! मर्यादा संभाळीत बसलें असतें...पण तुमच्यासारख्या बापाची, कसाबाची, सापाची मर्यादा सांभाळली असती तर तुमच्या पापी कामवासनेपायीं एक निर्मल बालिका बळी पडली असती ! आबा तुम्ही थोडा विचार करा ! आपण काय करतों आहोंत, त्याचा परिणाम काय होईल, याचा नुसता विचार सुद्धां तुम्हांला सुचत नाहीं ?

**आबा०** :— विचार ! साऱ्या गोष्टी मी विचारानेंच करीत असतों. माझ्या कार्याआड यायला तुला कुणीं सांगितलं ?

**सरला** :— कुणीं सांगितलं ? माझ्या मनाच्या सच्छीलतेनं, सद्विवेक-बुद्धीनं – माणुसकीनं.

**आबा०** :— माणुसकी, ही कसली माणुसकी ! पित्याच्या सुखाआड येणारी माणसकी !

**सरला** :— सुख, हें असलं सुख तुम्ही सेवन करणार ? सच्छील कुमारिकांच्या पावित्र्याची राखरांगोळी करून, त्या ढिगाऱ्यावर तुम्ही आपली सौख्याची इमारत उभारणार ? आबा थोडा विचार करा ! मी तुमची मुलगी तुम्हांला विचारतें, माझ्याकडे कुठल्या दृष्टीनं पाहातां तुम्ही ? ( आबा कांहीं बोलत नाहीं ) मग ज्या दृष्टीनं तुम्ही माझ्याकडे पाहातां त्या दृष्टीनं तुम्ही सुमतीकडे कां पाहात नाहीं ?

**आबा०** :— तुझ्याकडे ज्या दृष्टीनं पाहातों त्या दृष्टीनं सुमतीकडे पाहूं ? छे ! तें शक्य नाहीं ! !

**सरला** :— कां तें शक्य नाहीं. मी आणि सुमती एकाच वयाच्या, लहान-पणापासून आम्ही एकेठिकाणीं खेळलों, हंसलों; कांहीं वेळ तुमच्या आंगाखांद्या-वरही बागडलों.– त्यावेळीं तुम्ही आमच्याकडे कोणत्या दृष्टीनं पाहात होतात ? ती तुमची पवित्र दृष्टी एकदम नाहिशी कशी झाली ? समजा ज्या दृष्टीनं तुम्ही सुमतीकडे पाहात अहांत त्याच दृष्टीनें तुम्ही माझ्याकडे पाहाणार नाहीं कशावरून ?

( आबासाहेब दचकतात. त्यांची चर्या एकदम बदलते ) आबा आबा ! माझ्या प्रेमळ मातेची तुम्हाला इतक्यांत विस्मृति पडली ? ज्या आईच्या अंगाखांद्यावर मी आणि सुमती आनंदानं खेळलों बागडलों, तिच्या पोटच्या मुलीपेक्षांही — या सरलेपेक्षांही जिनं सुमतीचं कोडकौतुक केलं त्या तुमच्या मुलीप्रमाणं शोभणाऱ्या सुमतीला तुम्ही तुमची सहचारिणी करणार? जिच्या गळ्यांत गळा घालून भगिनीप्रेमानं मीं माझं सारं बाळपण मोठ्या आनंदानं घालवलं, त्या माझ्या बाल – मैत्रिणीला तुम्ही आपल्या अधिकाराच्या जोरावर माझी आई बनविणार ? आबा – आबा हें दुर्धर कटुसत्य माझ्या देखत्या डोळ्यांनीं कसं पहावेल ? जिला मी निर्मल अंतःकरणानं सुमती या एकेरी नांवानं संबोधलं तिलाच माझ्या हृदयाचे छिन्न विच्छिन्न तुकडे करणाऱ्या माई या आदरार्थी अनेक वचनी नांवानं कशी हांक मारूं ? नाहीं आबा – आबा माझ्यानें हें नाहीं होणार. सुमतीच्या आयुष्याचं हें सैतानी परिवर्तन मला दाखविण्यापेक्षां, आपल्याच हातानं या सरलेचा शेवट करा ! आपल्या हातून – या सरलेच्या प्रेमळ पित्याच्या हातून हें असलं नीच कृत्य झालेलं पाहाण्यापेक्षां मी जगांतूनच कायमची नाहींशी झाल्यें तर काय वाईट ? घ्या – या सरलेचा अंत करा – पाहातां काय !

**आबा०** :— सरले असं वेड्यासारखं काय बोलतेस पोरी ? माझ्या हातानं तुझा अंत करण्यासाठीं का मीं तुला एवढी मोठी केली ? पोटच्या पोरीचा बळी घेण्याइका का मी खाटकी अंतःकरणाचा आहे ?

**सरला** :— नाहीं ना ? इतके तुम्ही खाटकी अंतःकरणाचे नाहीं ना ? मग सुमतीची, तुमच्या मुलीची छळणूक तुम्ही आपल्या हातानं कां बरं चालविली आहे ? यापुढं मी तिला कोणत्याही तऱ्हेनें छळणार नाहीं, पित्याच्या प्रेमळ दृष्टीनं तिच्याकडं पाहीन असं मला वचन द्या ! तसं वचन मिळालं नाहीं, तुमच्या राक्षसी निश्चयापासून तुम्ही ढळलां नाहींत तर ही सरला तुमच्या पायांशीं डोकं आपटून प्राण देईल. बाबा – बाबा ( पाय धरते )

**आबा०** :— सरले वेडे पोरी काय आरंभलं आहेस हें तूं ? ऊठ, ऊठ पाहूं – मी माझ्या राक्षसी निश्चयापासून ढळलों आहें. यापुढं सरला आणि सुमती मला सारख्याच आहेत. सुमती माझी मुलगी आहे ! पित्याच्या प्रेमळ दृष्टीनंच मी तिच्याकडे पाहीन — ( सरला एकदम उठते )

**सरला** :— खरंच – खरंच बाबा ? बाबा – बाबा. आज मला किती आनंद झाला आहे म्हणून सांगूं !

**पद**

**या मधुबोलांनीं ताता ।**
**येई हृदयीं शांतता ॥ ध्रु० ॥**
**शीलातें सांभाळी अबलांच्या जो कृतिनें ।**
**त्यास होय प्राप्त सदा थोरपणा या जगतां ॥ १ ॥**

**आबा०** :— सरल – खरंच सरला, मी चुकलों होतों— विकाराच्या आहारीं जाऊन मी माझ्या कर्तव्याला पारखा झालों होतों. पण सरले तूं मला सावरलंस ! विकार आणि संयम यांत विकारानं आपलं कर्म उज्वल करून मला खोल दरींत लोटून द्यायचं टरविलं, पण तूं वेळींच येऊन संयमाला साहाय्य केलंस आणि मला अधोगतीच्या पथावरून मागें खेचलंस ! वडिलांनीं लहानांना मार्ग दाखवायचा असतो, पण तूं लहान असून मला मार्ग दाखविलास. सरले, मला क्षमा कर.

**सरला** :— आबा, मी कोण आपल्याला क्षमा करणार ? तुम्ही सुमतीची क्षमा मागा ! तिनं क्षमा केली कीं झालं !

**आबा ०**— पण ती मला क्षमा करील का ?

**सरला** :— पण तुम्हांला खरोखर पश्चात्ताप झाला आहे ना ?

**आबा ०**— सरले, खरोखरच मला पश्चात्ताप झाला आहे ? मी काय करूं म्हणजे तुझी खात्री होईल.

**सरला** :— सुमती सुखी व्हावी असं तुम्हांला खरोखरच वाटत असेल तर प्रथम अविनाशनां सोडवा ! त्यांच्यावरील आरोप नाहींसे करून त्यांना बंधमुक्त करा !

**आबा ०**— तें सहज होईल, माझ्या डोळ्यावर असलेल्या कैफानं बेहोष होऊन मींच तें कारस्थान केलं होतं, त्याला मी तावडतोब निर्दोष – बंधमुक्त करवितों, मग तर झालं ना ?

**सरला** :— खरंच !

**आबा०**— खरंच म्हणजे ! इतकाही विश्वास राहिला नाहीं माझ्यावर !

**सरला**:— विश्वास ! आतां विश्वास कां नसेल ? किती – किती चांगले आहांत तुम्ही आबा !

**आबा०**— असं— चल तर पोरी—

( पडदा पडतो. )



## प्रवेश ५ वा

( जंगल, आनंद घाबऱ्या घाबऱ्या प्रवेश करतो )

**आनंद**:— असे दिवाभीतासारखे लपून छपून दिवस काढावे लागत आहेत मला. ज्या आनंदानें आजपर्यंत कधींच कुणाची क्षिती बाळगली नाहीं त्याच आनंदाला आज पोलिसांना भिऊन रानोमाळ भटकावं लागतें आहे ! पण याला कारण कोण ? मींच नाहीं का ! माझ्याच हातानं मीं ही परिस्थीति निर्माण केली आहे ! तरुणपणीं भावनांवर जय मिळवणं मोठं दुर्घट असतं हें खरं, परंतु माणसानं संयम केला तर त्याला काय असाध्य आहे. स्वतंत्रतेनं अनुभवी माणूस स्वैराचारी बनतो, तसा मी स्वैराचारी झालों. आबासाहेबांचा अधिकार झुगारून देऊन, मी माझ्या मनाप्रमाणें वागूं लागलों. पैशाची वाटेल तशी उधळपट्टी केली ! पैशाला कौडीमोल लेखलं. पण पैशाचं मोल निढळाच्या घामानं ज्यानं तो मिळविला असेल त्यालाच असतं. मीं कांहीं तो पायांच्या सुया करून मिळविलेला नव्हता कींवा उपाशी पोटी, शेतांत राबून कमविला नव्हता. तर ऐदीपणानं घरांत राहून, आबासाहेबांनीं मिळविलेल्या पैशांवर हात मारला, आणि त्याची माझ्या मनाप्रमाणें विल्हेवाट लावली. मी हा असा स्वैरवर्तनी निघाल्यामुळें, आबासाहेबांनीं घरांतून हांकून दिलं ! जोंपर्यंत घरीं होतों तोंपर्यंत पैशाची मला कधींही ददाद भासली नाहीं. पण घराबाहेर पडल्यावर मात्र मला पैसा दिसेनासा झाला. पण विलासाला लालचावलेलं माझं मन मला स्वस्थ बसूं देईना. म्हणून मीं अखेर चोरीचा धंदा पत्करला. परंतु चोरी ती चोरीच, ती उघडकीस आल्याशिवाय कशी राहिल ! सत्य सूर्याच्या प्रकाशमय जगांत, पाप किती वेळ अंधारांत दडून

राहाणार ? तें उघडकीस येणारच !! केल्या कर्मांचीं फळं पुढल्या जन्मीं फेडण्याऐवजीं, माझ्यासारख्या कर्दमांत लोळणाऱ्या पाप्याला याच जन्मीं फेडावीं लागतात, याचं मी प्रत्यक्ष उदाहरण आहें ! जगांतील साऱ्या तरुणांनो ! वेळींच सावध व्हा ! तुमच्या आयुष्याची नौका याच वेळीं योग्य मार्गानं गेली नाहीं, तर ती माझ्याच आयुष्य–नौकेसारखीच अधोगतीच्या भेसूर खडकावर आपटून चक्काचूर झाल्याविना राहाणार नाहीं; म्हणून माझा हा स्वानुभव तुम्ही आपल्या हृदयांत सदैव जागृत ठेवा; हीच माझी तुम्हाला नम्र विनंती आहे ! माझ्या आयुष्यांतला हाच तुम्हाला शेवटचा प्रणिपात–यापुढें तुम्हाला हा आनंद कधींच दिसणार नाहीं. माणूस म्हणून जगांत जगायची लायकी नसलेला हा आनंद आत्मघातच करणार–राम–राम—

( जातो. )

---

## प्रवेश ६ वा



( सुमती विचारमग्न अशी खोलींत बसली आहे. आबासाहेबांचा वाडा. )

**सुमती** :— किती ही विचित्र विधिघटना ! प्रत्येक गोष्टीचा जों जों विचार करावा तों तों मति अगदीं कुंठीत होऊन जाते. कालचा तो प्रसंग आठवला कीं अजूनही अंगावर शहारे येतात. एका नरराक्षसाची दानवी लीला पाहिली कीं समाजांतील अबलांची करुण चित्रं डोळ्यांपुढं उभीं राहातात ! पैशाच्या बलावर पापी कृत्य करणाऱ्या अधमांच्या भेसूर हास्याचे कर्ण कठोर आवाज कानावर आदळतात, नी मग कांहीं सुचेनास होतं ! ! परमेश्वरावरचा विश्वास उडतो ! असं वाटतं कीं परमेश्वर जर अबलांचा रक्षणकर्ता आहे, तर मग तो माझ्या-सारख्या अबलेच्या हांकेला कां बर धांवून आला नाहीं ? ( विचार करून ) पण मी चुकत नाहीं का ? सरलाताईच्या रूपानं काल माझ्या रक्षणासाठीं परमेश्वरच नाहीं का धांवून आला ? खरंच अबलांचं रक्षण करणारी अद्‌भुत शक्ति या जगांत खात्रीनं वास करते आहे ! ( जंबिया काढून ) हीच ती अद्‌भूत शक्ती ! हाच तो पोलादी परमेश्वर ! ( दारावर थाप ऐकूं येते ) कोण आहे ? पण कुणी

का असेना, मला आतां भिण्याचं काय कारण? हा माझा पाठिराखा मजजवळ असतांना, मला कसली आली आहे भीति? जो कोणी येईल त्याला त्याच्या कृतीचं प्रायश्चित्त द्यायला हा समर्थ आहेच की!!

**अविनाश** :— ( आंतून ) सुमती–सुमती मी आहें!

**सुमती** :— मी? कोण मी? ( दार उघडते. अविनाश प्रवेश करितो. केस वगैरे पिंजरलेले असतात. ओळखूं न येण्यासारखा त्याचा चेहरा झालेला असतो ) कशाला आलास सैताना?

**अविनाश** :— सैताना! सुमती, मी सैतान! मला ओळखलं नाहींस? कशाला मला ओळखशील? कां बरं मला सैतान बोलणार नाहींस! तूं बोलत नाहींस हे, माझे ग्रह बोलत आहेत. बोल, बोल या निर्लज्याला; ज्यानं तुझ्याकरितां आपल्या सर्वस्वाची आहुती दिली, तुरुंगवास पतकरला आणि आतां तुझी भेट घेण्याकरितां तुरुंगांतून पळून येण्याचा, माझ्या मनाला भेकड असा वाटणारा मार्ग मीं स्वीकारला त्याची किंमत! या भगिनी प्रेमाची किंमत सुमती तूं मला सैतान ठरवून केलीस? श्रीमंतीचा हा महिमा! पैशाची ही अजब मोहिनी!! वसंतानं मला सांगितलं त्यावेळीं मला वाटलं, कीं सुमती तूं खरोखर संकटानं ग्रासून, तुझे डोळे सारखे माझ्या वाटेकडे लागले असतील. पण आतांच्या तुझ्या या एकाच शब्दानं माझ्या डोळ्यावरची भूल दूर झाली! मला – या अविनाशला कुठूनही यायला थोडा वेळ झाला, तर जी सुमती अतिशय काळजी करीत असे, तीच का ही सुमती बोलते आहे? मला डोळे आहेत ना? माझा मार्ग मी चुकलों तर नाहीं? जातों मीं. श्रीमंतीनं – मला – एके काळच्या तुझ्या हृदयाच्या भावाला विसरलेल्या श्रीमंत सुमती, जातों मी.

**सुमती** :— दादा ओळखलं नाहीरे तुला – माझं मन ताळ्यावर नाहीं. त्यामुळें तूं मला ओळखूं आला नाहींस.

**अविनाश** :— कशी ओळखशील मला? मी नालायक आहे! समाजानं ठरविलेला एक चोर आहे! जातों मी......

**सुमती** :— दादा, जाऊं नको, थोडा वेळ थांब! मी सांगतें तें ऐकून घे! मी श्रीमंत झालें नाहीं. श्रीमंत झालें असतें! त्या सैतानाच्या म्हणण्याला कबुली दिली असती तर माझ्यावर या खोलींत खितपत पडण्याची पाळी कां आली

असती ! माझ्या मेलेल्या जिवाला अधिक मारूं नकोस रे ! माझी कहाणी ऐकून घे आणि नंतर तुला जें कांहीं करायचें असेल तें कर.

**अविनाश** :— म्हणजे तूं म्हणतें आहेस काय सुमती तें मी समजलों नाहीं. प्रथम दर्शनींच तुझ्या तोंडून निघालेल्या हृदभेदक शब्दांनीं मला वाटलं कीं, तूं आबासाहेबांच्या म्हणण्याला रुकार दिलास, त्यांच्या पैशाची मोहिनी पडली आणि तूं मला झिडकारलसं !

**सुमती** :— नाहीं दादा. दादा, तो तुझा निव्वळ तर्क आहे ! मीं त्या सैतानाच्या म्हणण्याला रुकार दिला असता तर माझी अशी स्थिती कां झाली असती ? पण मी त्याच्या म्हणण्याला रुकार देऊन, माझ्या दादाच्या स्वाभिमानी मनाला क्लेश देण्याचें नीच कृत्य कसं करीन ? ज्या माझ्या दादांनीं माझ्या सुखाकरितां आपल्या सुखाला तिलांजली दिली, त्या माझ्या पाठिराख्या परमेश्वराला लाथाडण्याइतकी ही सुमती कृतघ्न कशी बरं होईल ! नाहीं दादा, त्याचं म्हणणं मुळींच मान्य केलं नाहीं मीं.

**अविनाश** :— शाबास, सुमती शाबास ! मीं केलेल्या यज्ञाची तूं पूर्तता केलीस, आणि यापुढं येणाऱ्या संकटाला तूं असंच तोंड दे ! पण आतां तूं तरी इथं कशाला राहातेस ! चल आपण कुठं तरी दूर जाऊ कीं, जिथं आबासाहेबासारखीं कृष्ण अंतःकरणाचीं माणसं नसतील, लेखणीच्या द्वारें लोकांचे गळेकापू, सुधीरसारखे सैतान नसतील, अशा पृथ्वीपलीकडील कुठल्या तरी स्वतंत्र वातावरणांत जाऊन, बंधू–भगिनी–प्रेमाच्या धवल किरणांनीं तो प्रांत पवित्र करून, तिथं आपण मोठ्या आनंदानं कालक्रमण करूं ! चल येतेस ना ?

**सुमती** :— हो मोठ्या आनंदानं, पण आधीं आपण सरलाताईची भेट घेऊं चल. ( जातात )

**आबा०** — ( थोड्या वेळानं आबासाहेब पश्चात्तापयुक्त अंतःकरणानें प्रवेश करितात ) काय केलं मीं हें माझं मलाच कळत नाहीं. विकारी वासनेला बळी पडून मी सुमतीच्या आयुष्याचा नाश करायला प्रवृत्त झालों. अविनाशवर चोरीचा खोटा आळ आणला, दोन जिवांना माणुसकींतून उठवायला कारणीभूत झालो, पण सरलेनं माझ्या डोळ्यांत झणझणीत अंजन घालून मला ताळ्यावर आणलं, मला आतां पूर्णपणें पश्चात्ताप झाला आहे ! कोणत्या तोंडानं सुमतीची क्षमा मागूं ? हें काळं तोंड तिला दाखवूं तरी कसं ? मला ती क्षमा करील का ?

सुमती सुमती—( सुमतीकडे पाहातो—सुमती दिसत नाहीं ) कुठं गेली सुमती ? तिनं आपल्या जिवाचं बरं वाईट केलं तर नाहीं ना ? ( सुधीर बुरखा घेऊन प्रवेश करतो ) कोण तूं ? मीं केलेल्या पापाचं प्रायश्चित्त देण्याकरितां कां तूं इथं आला आहेस ?

**सुधीर** :—होय. तुझ्या पापाचा जाब मागण्याकरितां मी इथं आलों आहें, तुला देहान्त प्रायश्चित्त देण्याकरितां........

**आबा०** :—देहांत प्रायश्चित्त ? माझं पाप याच वेळेला माझ्या पुढं कसं उभं राहिलं ? ( भेदरट दृष्टीनं पाहातो )

**सुधीर** :—असा भेदरलेल्या दृष्टीनं माझ्याकडे काय पाहातोस ? पाहा, पाहा मी कोण आहें तो ? ( बुरखा काढतो )

**आबा०** :—कोण सुधीर ?

**सुधीर** :—चूप एक शब्द अधिक बोलूं नकोस ? तूं आजपर्यंत केलेल्या अपमानाचा सूड मला उगवायचा आहे. ( आबासाहेबांची गळपट्टी धरून सुधीर त्यांना पाडणार इतक्यांत सुमती जंबिया घेऊन सुधीरच्या अंगावर धांवत येते )

**सुमती** :—दूर हो राक्षसा.

**सुधीर** :—( एकदम बाजूला होतो ) कोण सुमती.

**सुमती** :—बाजूला हो, खाल्ल्या घरचे वासे मोजणाऱ्या कृतघ्ना बाजूला हो ! नाहीं तर हा जंबिया तुझ्या छातींत शिरलाच म्हणून समज !

**आबा०** —कोण सुमती, काय पाहातों आहें मी हें ? सुमती देवते, क्षमा कर मला ! केल्या अपराधाचा मला पुरेपूर पश्चात्ताप होतो आहे. ( सुमतीचे पाय धरून )

**सुमती** :—आबासाहेब हें काय असं वेड्यासारखं !

**आबा०** :—तें कांहीं नाहीं. सुमती मला क्षमा केली असं म्हटल्याखेरीज मी तुझे पाय सोडणार नाहीं. देवी, मला पुर्नजन्म देणाऱ्या माझ्या माते, क्षमा कर मला. ( पाय धरले असतांना सुधीर पळण्याचा प्रयत्न करतो. इतक्यांत अविनाश आणि सरला प्रवेश करतात. )

**अविनाश** :—कुठं चाललास, बदमाषा ? मुकाट्यानं इथं उभा राहा.

**सुधीर** :—कोण अविनाश, पळून आलास कैदेंतून ?



**सुमती** :— माझी कहाणी ऐकून घे आणि नंतर तुला जें कांहीं करायचं असेल तें कर.

[ पृ. ७९ ]

**अविनाश** :— मीं पळून आलों कीं तूं पळून चालला आहेस तें मग पाहूं. पण प्रथम इथं उभा राहा.

**सरला** :— ( पुढें येऊन ) सुमती कर आबांना क्षमा ! ते पश्चात्तापानं शुद्ध झाले आहेत.

**सुमती** :— आबा उठा !

**आबा** ०— नाहीं तूं मला क्षमा केली असं प्रत्यक्ष तोंडानं म्हटल्याखेरीज मी तुझे पाय सोडणार नाहीं.

**सुमती** :— केली क्षमा, उठा ( उठून अविनाशकडे केविलवाण्या दृष्टीनं पाहातात इतक्यांत दोन पोलीस व इन्स्पेक्टर प्रवेश करितात. )

**पोलीस** :— सुधीर देसाई कोण आहेत का ?

**सुधीर** :— कां, मी आहें !

**पोलीस** :— तुमच्यावर वारंट आहे.

**सुधीर** :— कशाबद्दल ?

**पोलीस इन्स्पे०** :— तुम्ही चोरीचे दागिने विकल्याबद्दल तुम्हांला आम्ही अटक करीत आहोंत. तुमच्या आनंदराव देशमुख नांवाच्या एका साथीदाराला तो नदींत जिव देत असतांना पकडला आहे.

**सुधीर** :— ( सुधीरच्या हातांत बेड्या घालतात ) माझ्याकडे असे पाहातां का ? मी आज कैदी झालों म्हणून ? त्यांत काय आहे ? असे तुच्छतेनं माझ्याकडे पाहातां ! पण लक्षांत ठेवा आज नाहीं उद्यां, दहा वर्षांनीं माझ्या अपमानाचा बदला घेतल्याविना राहाणार नाहीं. हा सुधीर म्हणजे भयंकर प्राणी आहे. उद्यां सुटून आल्यावर तुमच्या घरादाराला आग लावून तुम्हां सार्‍यांना भस्मसात केलं नाहीं, तर नांवाचा कारकुनी बच्याच नव्हे ! !

**पोलीस इन्स्पे०** :— चल ये असा. भ्रमिष्टासारखा पाहातोस काय ? चला खेचा त्याला. ( घेऊन जातात. )

**सरला** :— आबा, आनंदाला देखील पकडला आहे.

**आबा** :— पकडूं दे त्याला, मला कांहींच वाटत नाहीं त्याच्याबद्दल. केल्या कर्मांचीं फळं ज्याचीं त्यांनीं भोगावीत ! गडगंज संपत्तींत वाढलेलीं मुलं अशींच

असायचीं ! अविनाश ( अविनाश दुसरीकडे पहातो ) नको – अविनाश असा दुसरीकडे पाहूं नकोस, मी सारं कांहीं समजून चुकलों आहें ! नाहक तुझ्यावर आळ आणून तुला कैद करवलं; पण तूं खरा खुरा कैदी नाहींस, तूं गुन्हेगार नसल्याबद्दल वरिष्ठ अधिकाऱ्यांची भेट घेऊन त्यांना मी सगळं सांगितलें आहे आणि मी माझी फिर्यादही स्वखुषीनें काढून घेत असल्याबद्दल त्यांच्याकडे लेखी लिहून दिलं आहे. आतां तुला कुणीही पकडणार नाहीं. ( मामलेदारांकडून पोलीस लखोटा घेऊन येतो. )

**पोलीस** :— रावसाहेबांनीं आपल्याला हा लखोटा दिला आहे !

**आबा ०**— दे पाहूं, काय आहे त्याच्यांत ? ( लखोटा घेतात, पोलीस जातो ) ( वाचून ) अविनाश संपूर्ण निर्दोषी असून त्याला बंधमुक्त करण्यांत आलें आहे. अविनाश, तूं बंधमुक्त झालास; पण मला तुझी क्षमा मागूं दे ! खरोखर अविनाश मी तुझा अत्यंत अपराधी आहें !

**अविनाश** :— आबा – क्षमेचं आतां कांहींच कारण उरलं नाहीं, पश्चात्ताप-दग्ध होऊन तुमच्या तोंडून निघालेले हे निर्मल शब्द ऐकून माझा सारा राग मावळला आहे – हें तुमचं झालेलं परिवर्तन पाहून मला आनंदही झाला आहे.

**आबा०** :— धन्य आहेस तूं ! तुझं हें उदार अंतःकरण पाहून मला माझ्या कृतीबद्दल, राहून राहून वाईट वाटतें. अविनाश, माझ्या उभ्या आयुष्यांत मीं इतकीं अगणित पापें केलीं आहेत, कीं त्या पापामुळें तुमच्या पुढं उभं राहाण्याची सुद्धां लाज वाटते !

**अविनाश** :— आबा – झालं तें होऊन गेलं; त्याबद्दल वाईट वाटून घेण्यांत काय अर्थ आहे ?

**आबा०** :— अविनाश, तूं खरोखरच गुणाचा पुतळा आहेस !

**अविनाश** :— स्तुतीची अतिशयोक्ती होते आहे आबा !

**आबा०** — योग्य तीच स्तुति करतों आहें मी ! हजारों शेतकरी बांधवांबद्दलची तुझ्या हृदयांत वसत असलेली सहानुभूति, उघड्या डोळ्यांनीं मी आजपर्यंत पाहात आलों आहें. पण त्या वेळीं माझ्या डोळ्यांवर पैशांची धुंदी होती; आम्ही सावकार करूं तें होईल असं वाटत होतं, पण तें व्यर्थ आहे. जगांत – राष्ट्रांत – सौख्याचं संपूर्ण वातावरण निर्माण व्हायला पाहिजे असेल तर रावरंक एक

झाले पाहिजेत, सर्वांचा दर्जा समान समजला पाहिजे, गडगंज संपत्तींत लोळणारा सावकार एकीकडं, तर त्याच्या विरुद्ध, पोटासाठीं तडफडणारे लाखों गरीब दुसरीकडं, असली विषम समाजरचना नाहींशी झाली पाहिजे आणि ती नाहींशी होईल तरच साऱ्या जनतेला सुखानं जगांत दिवस काढतां येतील !!

**अविनाश** :— आबा – अगदीं सत्य बोललांत तुम्ही. असं होईल तरच साऱ्यांना सौख्याचा संपूर्ण आस्वाद घेतां येईल !

**आबा०** :— आणि त्याच तत्त्वानुसार मी आतां वागणार आहें.

**सरला** :— म्हणजे काय करणार आहांत ?

**आबा०** :— थांब – जरा थांब, अशी घाई करूं नकोस. यापुढें मी माझी सारी संपत्ती शेतकरी संघाच्या हवालीं करणार आहें ! आणि नंतर............

**सुमती** :— नंतर काय करणार —

**आबा०** :— काय करणार असेन असं वाटतं – काय केलं म्हणजे तुमचें समाधान होईल ?

**सुमती** :— मी काय सांगणार ! ( वसंताला कोकिळा ओढीत आणते )

**आबा०** :— अरे – अरे हें काय ? कोकिळे वसंताला कां अशी ओढून आणते आहेस ?

**कोकिला** :— अविनाश ऐवजीं यांना बंदिवान करा असं मी तुम्हाला सांगायला आलें आहें.

**आबा०** :— थांब हं, मी मुळीं सर्वांनाच बंदीवान करणार आहें !

**कोकिला** :— बंदिवान ? तें कां बाई ?

**आबा०** :— थांबा सांगतों मी ! या सरलेला अविनाश ऐवजीं कैदी व्हावंस वाटत होतं – म्हणून सरले, इकडे ये पाहूं आणि अविनाश तूंही इकडे ये ( सरला आणि अविनाश यांचे हातांत हात देतात ) — सरले, तुला मी या अविनाशची बंदिवान करतों. ( इतक्यांत रामजी येतो त्याला पाहून ) अरे वा, तूंही बरा आलास वेळेवर कन्यादान करायला.

**रामजी** :— म्हणजे काय ?

**आबा० :**— म्हणजे असं कीं, ही कोकिला या वसंताला बंदिवान करा असं मला सांगायला आली आहे, तेव्हां ह्या दोन बंदिवानांच्या देखत, या वसंताला या कोकिलेचा बंदिवान करतों !

**कोकिला :** — म्हणजे

**आबा० :**— म्हणजे कांहीं नाहीं – कोकिला वसंत इकडे या ( दोघेही जवळ येतात त्यांचे हातांत हात देतात ) वसंत तूं या कोकिलेचा बंदिवान झालास.

**वसंत :**— आबा या जन्मीं तर बंदिवान झालोंच, परन्तु हिचा सात जन्मीं सुद्धां मी मोठ्या आनंदानें बंदिवान होईन; खरं ना कोकिला.

**कोकिला :**— इश्य ! ( सारे हांसतात )

**आबा० :**— अविनाश, सरले, तुम्ही सारे आतां परस्परांच्या हातांत हात देऊन जन्माचे बंदिवान झालांत. आतां माझी काय वाट ?

**अविनाश :**— म्हणजे ?

**आबा० :**— अविनाश, तुझ्याजवळ मी एक याचना करितों आहे, ती माझी याचना तूं पुरी नाहीं का करणार ?

**अविनाश :**— पण कोणती ?

**आबा० :**— आजपर्यंत ज्या माझ्या शेतकरी – बंधूना – दलितांना मी छळलं, त्यांची सेवा करण्याचं कार्य तुझ्या संघांत आल्यानं मला करतां येईल. त्या संघांत मला तूं नाहीं का घेणार ? माझं व्रत मला पुरं करण्याची संधि नाहीं का देणार ?

**अविनाश :**— अवश्य ! अगदीं अवश्य.

**आबा० :**— होय ना ! मग बोला शेतकऱ्यांचा विजय असो !

**वन्दे मातरम्**

## समाप्त